# नवभारत

जानेवारी २०१४



❋ ग्रामीण शिक्षणाचे काही प्रश्न

❋ मानववादाची विविध परिमाण (प्रस्तावना)

❋ इतिहास आणि लोकसंस्कृती : परस्पर अनुबंध

❋ धर्मनिरपेक्षता, धर्मस्वातंत्र्य आणि न्यायालयाचे निकाल



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई










नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका







प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६७। अंक ४। जानेवारी २०१४
मार्गशीर्ष/पौष/माघ शके १९३५
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

---

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)



अनुक्रमणिका

# नवभारत

## जानेवारी २०१४

## अनुक्रमणिका

# ग्रामीण शिक्षणाचे काही प्रश्न

रमेश पानसे

माझे सारे शिक्षण शहरात झाले. पुढे विद्यापीठीय पातळीवरची प्राध्यापकीही मी मुंबईसारख्या शहरातच केली. त्यामुळे, वयाच्या चाळिशीपर्यंत मी शिक्षणालाच भिडलो होतो. पण ग्रामीण शिक्षणाला, अर्थातच, नाही. त्यानंतर मात्र, ग्राममंगल संस्थेच्या स्थापनेच्या निमित्ताने माझा ग्रामीण शिक्षणात प्रवेश झाला, आणि गेली तीस वर्षे ग्राममंगल (स्थापना १९८२) आणि गेली सुमारे वीस वर्षे 'महाराष्ट्र बालशिक्षण परिषद' (स्थापना १९९४) या दोन संस्थांचा कायमचा कार्यकर्ता म्हणून माझा ग्रामीण प्रदेशाशी आणि ग्रामीण शिक्षणाशी घनिष्ठ संबंध बांधला गेला. हा संबंध एकाच वेळी शालेय शिक्षण व शालापूर्व म्हणजे बालशिक्षण ह्या शिक्षणाच्या दोन स्तरांशी आला; आणि त्याच वेळी ग्रामीण भाग व त्यातही आदिवासी भाग, यांच्याशी हा शिक्षणसंबंध येत गेला. आणखीही एका वैयक्तिक गोष्टीचा उल्लेख करायला हरकत नसावी. मी अर्थशास्त्राचा प्राध्यापक, शिवाय कायद्याचा पदवीधर असल्यामुळे समोर येणाऱ्या परिस्थितीकडे व प्रश्नांकडे पाहण्याची एक शास्त्रीय दृष्टी, नकळतपणे, निर्माण झाली होती. त्यातही पुढे मी एक अभ्यासक म्हणून शिक्षणशास्त्राला पायाभूत असणारी, मानसशास्त्र, भाषाशास्त्र, मज्जाशास्त्र अशी शास्त्रे नि त्यांची जोडशास्त्रे यांच्याशी मैत्री करू लागल्यामुळे, शिक्षणाच्या बाह्य (म्हणजे आर्थिक-सामाजिक वगैरे) प्रश्नांबरोबरच प्रत्यक्ष शिक्षण-व्यवहारातले अंतर्गत (म्हणजे प्रत्यक्ष शिक्षणप्रक्रियेशी संबंधित असे) प्रश्नही नेटकेपणाने न्याहाळता येऊ लागले. ग्राममंगल संस्थेने अशा प्रश्नांची वेळोवेळी दखल घेऊन, ते सोडविण्याचे प्रयोग-प्रयत्न केले. तसेच त्या आधारे शिक्षणाला गुणवत्तेकडे नेणारे काही उपयुक्त नमुनेही तयार केले (उदा., अध्ययनघर, शास्त्रालये, विकासघरे, छंदघरे, द्विभाषा समृद्धी प्रकल्प इत्यादी).

या लेखात, मी प्रामुख्याने शिक्षणप्रक्रियेतील अंतर्गत प्रश्नांकडे आपले लक्ष वेधणार आहे. कदाचित त्यांच्या चर्चेच्या अनुषंगाने शिक्षणसंबंधित पण बाह्य प्रश्नांना स्पर्श होईलही.

**शासनाचे प्रयत्न :**

वास्तविक, शिक्षणाचे प्रमुख प्रश्न हे शिकणाऱ्यांचे प्रश्न आहेत, शिकणाऱ्या मुलांविषयीचे प्रश्न आहेत. मला वाटते, याकडे वर्षानुवर्षे आपले दुर्लक्ष झाले आहे. आपण आजवर शिकवणाऱ्यांचे, म्हणजे शिक्षक-शिक्षिकांचे प्रश्न हेच मुख्यतः सोडविण्याचा प्रयत्न करीत गेलो आहोत. शासनाकडून तर मुलांना शाळेत 'येती' करण्याचा आणि आल्यावर त्यांना सरकारी शाळांमधून 'टिकती' करण्याचा हे दोन प्रश्न सोडविण्यावरच केवळ भर आहे. त्यामुळे मुलांना चांगले शिक्षण देऊन त्यांना 'शिकती' करण्याच्या प्रश्नाकडे आजवर दुर्लक्षच झाले आहे.

शासनाकडून कित्येकदा अतिशय चांगली धोरणे अवलंबिली जातात. अलीकडचे शिक्षणातले उदाहरण म्हणजे, २००५ साली 'राष्ट्रीय शिक्षणक्रम आराखडा' तयार करून, केंद्रसरकारने, मुलांच्या अंगाने शिक्षणाचा विचार करू पाहणाऱ्या ('ज्ञान) रचनावादी' शिक्षण-प्रणालीचा अवलंब केला आहे. २००९ साली 'बालकाच्या मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा कायदा' करून शिक्षणाच्या सार्वत्रिकतेची तर खात्री दिलीच आहे; पण त्याचबरोबर, मुलांना शिकविण्यापेक्षा मुलांच्या शिकण्यावर भर देणारी ही रचनावादी शिक्षणप्रणाली देशभर पसरावी अशी तरतूद केली आहे. महाराष्ट्र राज्याने, केंद्रसरकारच्या धर्तीवर आपलाही शिक्षणक्रम आराखडा २०१० साली तयार करून, रचनावादी शिक्षणाच्या दिशेने वाटचाल सुरू केली आहे.

**ज्ञानरचनावादी शिक्षण :**

ज्ञानरचनावादी शिक्षण हे आजवरच्या शिक्षणात मूलभूत परिवर्तन करणारे आहे. आजवरचा शिक्षणा-विषयीचा विचार हा, मुलांना कुणीतरी (शिक्षकाने)

अनुक्रमणिका






शिकवायचे आहे, याच अंगाने झाला. ज्ञानरचनावाद नेमकी उलटी भूमिका घेतो. मुले आपली आपणच शिकतात, तशी प्रेरणा त्यांना उपजतच असते. आपल्या 'ज्ञाना'ची रचना मुले स्वतःची स्वतःच करतात, आपल्या आधीच्या ज्ञानाला (पूर्वज्ञान) जोडूनच, मुले नवीन ज्ञान साकार करतात. नवीन ज्ञान मिळवताना, मुले, स्वतःच शोध घेत घेत शिकतात. हा शोध घेणे म्हणजे स्वतः अनुभव घेणे. मुले स्वानुभवातून शिकतात. लहान वयात तर प्रत्यक्ष करून (कृतिशील) अनुभव घेता आले, तर मुले अधिक चांगली शिकतात. मेंदू हा मुलांचा (माणसाचा) शिकण्याचा अवयव आहे आणि निसर्गतःच मुलांना शिकायला आवडते. ही मुलांविषयीची नव्याने उपलब्ध झालेली माहिती आधाराला घेऊन त्यावर रचनावादी शिक्षणाची नवी इमारत उभी केली जात आहे.

अनेक देशांमधून, भारतातही अनेक व्यक्ती व अनेक व्यक्ती व अनेक संस्थांकडून, महाराष्ट्रात उपक्रमशील शाळांनी केलेल्या अनेक प्रयोगांतून आणि प्रत्यक्षपणे आम्ही ग्राममंगल संस्थेकरवी गेली वीस वर्षे करीत असलेल्या प्रत्यक्ष कामांमधून, आता हे सिद्ध झाले आहे की, रचनावादी पद्धती ही, सर्वच मुलांना यश देणारी, शिकण्यातील आनंद देणारी आणि मुख्य म्हणजे प्रत्येक मुला-मुलीला क्षमतेनुसार, गरजेनुसार व आवडीनुसार शिकण्याचा न्याय देणारी अशी शिक्षण-प्रणाली आहे. किंबहुना म्हणूनच, जगभर तिचा स्वीकार व प्रसार होत आहे. आपले सर्वांचेच आता कर्तव्य आहे की, शास्त्रीय पद्धतीने शिकण्याची संधी देणारी ही पद्धती, प्रत्यक्षपणे प्रत्येक शिकणाऱ्या मुला-मुलींपर्यंत पोचेल, त्यासाठी लागणारी साधनसामग्री प्रत्येक शाळेला प्राप्त होईल आणि शिक्षकांना या पद्धतीचे योग्य ते शिक्षण–प्रशिक्षण प्राप्त होईल, हे पाहणे. थोडक्यात, ही रचनावादी शिक्षणप्रणाली सबल किंवा प्रभावी करण्याचे काम, एक शैक्षणिक स्वरूपाचे सामाजिक कार्य म्हणून आपल्याला त्वरेने करावे लागेल. मनाच्या नि पैशाच्या गुंतवणुकीचा ओघ इकडे वळवावा लागेल.

मी, या लेखात, शिक्षणाच्या अंतर्गत प्रश्नांचा जो विचार करणार आहे तो, भूतकाळातील शिक्षणप्रश्नांचा नसून, भावी काळासाठी शिक्षण सुदृढ व्हावे याची जी खटपट आपण सुरू केली आहे, रचनावादी शिक्षणाच्या अंमलबजावणीचा जो प्रयत्न आपण सुरू केला आहे, तिच्यामध्ये येणारे आजचे म्हणजे वर्तमानकालीन असे जे प्रश्न आहेत, त्यांचाच विचार करणार आहे.

**रचनावादी शिक्षणाचे आजचे प्रश्न :**

रचनावादी शिक्षणपद्धती शिकू पाहणाऱ्या मुलांसाठी फायद्याची आहे, तर मग ती मुलांच्या चालू पिढीसाठीच प्रभावी रीतीने राबविली पाहिजे. हे करताना, त्यात येणारे किंवा येऊ शकणारे अडथळे व अडचणी मुळातच दूर ठेवण्याची गरज आहे. वरवर पाहता तरी मला या संदर्भात तीन क्षेत्रे अशी दिसतात की, जेथे लक्ष देऊन तेथील अडथळे पार करावे लागतील. पहिले क्षेत्र आहे ते साऱ्या रचनावादाची भिस्त ज्या मूळ तत्त्वावर आहे ते 'पूर्वज्ञानाचे तत्त्व' विचारात घेऊन शिक्षणाची आखणी करण्याचे क्षेत्र. दुसरे आहे ते म्हणजे रचनावादाचा प्राण असलेले विद्यार्थ्यांना कृतिशील शिक्षणाच्या संधी देण्याचे क्षेत्र. तिसरे क्षेत्र आहे ते अधिक व्यापक स्तरावर, रचनावादाचा स्वीकार करण्यासाठी समाजाची मानसिकता घडविण्यावे क्षेत्र.

ग्रामीण भागातील शालेय शिक्षणाच्या संदर्भात, रचनावादी शिक्षणाची पायाभरणी करताना जाणवणारे आणि या तीन क्षेत्रांत उद्‌भवणारे असे मुख्य सात प्रश्न मी आज आपल्यापुढे ठेवीत आहे. हे सर्व प्रश्न प्रत्यक्ष शालेय वर्गामधील शिक्षणप्रक्रिया प्रभावी करताना भेडसावणारे प्रश्न आहेत. आपण क्षेत्रवार या प्रश्नांचा विचार करू या.

**रचनावादी शिक्षणातील पूर्वज्ञानाचे तत्त्व :**

मज्जा-मानसशास्त्राच्या (Neuropsychology) अभ्यासातून असे लक्षात आले की, नवी माहिती–नवे ज्ञान आत्मसात होताना, ते, त्यापूर्वी माहीत असलेल्या, ज्ञात असलेल्या गोष्टींशी जोडूनच मानसपातळीवर स्वीकारले जाते. हे पूर्वज्ञान जेवढे जास्त, तेवढी नव्या ज्ञानाची इमारत मोठी आणि पक्की. पूर्वज्ञान याचा व्यवहारात अर्थ 'आधी मिळालेले ज्ञान' असा आहे. ह्या आधीच्या ज्ञानाचे स्वरूप व पातळी विचारात घेऊन मुलांना, घरी वा शाळांतून नवीन ज्ञान प्राप्त करण्याच्या संधी द्याव्या लागतात. मुले सहाव्या वर्षी जेव्हा औपचारिक

अनुक्रमणिका

शिक्षणाच्या प्रांगणात प्रवेश करतात, तेव्हा आधीच्या सहा वर्षांत त्यांनी विविध प्रकारच्या नि सहजतेने घरी-दारी मिळणाऱ्या अनुभवांचा मोठा साठा केलेला असतो. त्याच्या आधारेच ती आपले पुढील शिक्षण करू पाहतात.

ग्रामीण भागाचा या संदर्भातला नेमका प्रश्न असा आहे की, मुलांची ही आधीची आपसूक होणारी तयारी फार कमी असते. आदिवासी भागांत तर ती काळजी करावी इतकी कमी असते. साहजिकच, त्यांना शालेय शिक्षणात, सुरुवातीलाच खूप अडथळे येतात. लेखन-वाचन-गणन ही कौशल्ये प्राप्त करताना त्यांना खूपच ऊर्जा खर्च करावी लागते. वेगवेगळे विषय समजावून घेताना, बऱ्याचदा त्यांची आकलनशक्ती कमी पडते; कारण त्यांचे पूर्वीचे व आत्ताचे अनुभवविश्वच फार छोटे व संकुचित असते. साहजिकच, अगदी सुरुवातीपासूनच शिकण्याच्या कामात ही मुले मागे पडताना दिसतात. त्यांच्या प्रत्यक्ष शालेय शिक्षणातही, ही राहिलेली अनुभवप्राप्तीची त्रुटी भरून काढता येईल, अशी व्यवस्था नसते. त्यामुळे, कदाचित शालेय परीक्षांत चांगले गुण मिळूनही ही मुले 'चांगले' शिकण्यात कमी पडतात.

या समस्येची नेमकी उकल होण्यासाठी आपल्याला आणखी खोलवरचा शोध घ्यायला हवा. हा शोध ग्रामीण (आणि आदिवासी) समाजाच्या सांस्कृतिक आणि भाषिक जीवनपद्धतीत व जीवनव्यवहारात उतरून घ्यायला हवा.

**अल्पविकसित संस्कृतीचा प्रश्न :**

संकल्पना, संकेत, संज्ञा, शब्दसंग्रह, कल्पना, विचार, मर्मदृष्टी (Insight), अंदाजदृष्टी (Foresight) या व अशा आणि शिक्षणात उपयुक्त ठरणाऱ्या अनेक गोष्टी माणसाला संस्कृतीतून व त्याच्या वैयक्तिक पातळीवर मिळणाऱ्या अनुभवांतून मिळत असतात. साहित्य, संगीत, क्रीडा, नृत्य, नाट्य, चित्रकला व अन्यकला ही सारी अनुभवविश्व विस्तारणारी व संपन्न करणारी साधने असतात. जेव्हा यांपैकी काहींची किंवा सर्वांचीच वानवा असते, तेव्हा अनुभवविश्व संकुचित राहून, शिकण्याच्या क्षमतांतच दुबळेपणा राहतो. ग्रामीण महाराष्ट्रातील तालुकेच्या तालुके असे आढळतील की, जिथे मुलांचे अनुभवविश्व समृद्ध करणारी ही साधनेच अस्तित्वात नाहीत अथवा अत्यंत अपुरी आहेत. विविधांगी अनुभवाचे क्षेत्रच जेव्हा मर्यादित असते, तेव्हा त्यावरची नव्या ज्ञानाची रचनाही पुरेशी नसते आणि पुरेशी ताकदवान नसते. एक अभ्यास असे सांगतो की, मागास घरांमधून मुलांचा बुद्ध्यंक अगदी ७९ पर्यंत खाली असण्याची यामुळे, शक्यता असते. पुढारलेल्या किंवा प्रगत घरांतून अगदी ११७ इतका बुद्ध्यंक असतो. या ठिकाणी हे आकडे फारसे महत्त्वाचे नाहीत; तर प्रगत नि मागास संस्कृतींमधील फरक बुद्ध्यंकविकासात फरक करतो हे लक्षात घेणे महत्त्वाचे आहे. या कारणाने ग्रामीण मुले शिक्षणात मुळातच कमी पडतात. आदिवासी भागात तर ही कमतरता फार मोठी असते.

**अल्पविकसित भाषेचा प्रश्न :**

वास्तविक भाषा हा संस्कृतीचाच एक अविभाज्य भाग आहे. परंतु शिक्षणात भाषेचे विशेष महत्त्व असल्याने त्याचा वेगळा विचार करण्याची गरज आहे. कोणत्याही विषयाचे शिक्षण घेण्याचे, एवढेच नव्हे, तर विचार करण्याचे, कल्पना करण्याचे आणि जीवनातील अनेक व्यवहारांचे ते साधन आहे. त्यामुळे आपली आत्मसात केलेली पहिली भाषा समृद्ध असणे ही बाब चांगल्या शिक्षणासाठी नि चांगल्या जीवनासाठी आवश्यक असते.

मुले प्रथमतः शाळेत प्रवेश करतात, तेव्हा त्यांना आपली भाषा अवगत असते; पण ती कितपत समृद्ध असते, हा शिक्षणाच्या दृष्टीने कळीचा प्रश्न आहे. भाषा ही ऐकून आणि बोलूनच अवगत होत असते. त्यासाठी भाषा ऐकण्याच्या नि ती बोलण्याच्या खूप संधी मुलांना मिळाव्या लागतात आणि ग्रामीण भागात हीच तर खरी, मोठी अडचण असते. आर्थिक व सामाजिक व्यवहार ठरावीक आणि मर्यादित असतील, तर भाषा हीसुद्धा त्यांच्यापुरतीच मर्यादित राहते. याउलट, प्रदेश विविध व्यवसायांनी, सांस्कृतिक संस्थांनी, त्यांच्या अनेक उपक्रमांनी नटलेला, बहरलेला असेल, तर भाषाही विकास पावते आणि उगवत्या पिढीला याचा लाभ मिळतो. काही स्थूल आकडेवारी असे सांगते की, पुढारलेल्या वस्तींतील-घरांतील मुलांना, वयाच्या तीन वर्षांपर्यंत पाच लाख प्रोत्साहक शब्द ऐकायला मिळतात आणि ८० हजार नाउमेद करणारे शब्द ऐकावे लागतात. परंतु मागास वस्तींतून-घरांतून जेमतेम ७५ हजार प्रोत्साहक

शब्द तर दोन लाख नाउमेद करणारे शब्द मुलांच्या कानी पडतात. मुळातच, शब्द ऐकायला मिळणे, भाषाविकासाच्य दृष्टीने महत्त्वाचे. पुढारलेल्या घरांतून दर ताशी ४८७ उद्गार मुलांना ऐकायला मिळतात. मागास घरांतून हे प्रमाण निम्म्यापेक्षाही कमी म्हणजे केवळ १७८ उद्गार इतके आहे. त्यामुळे पुढारलेल्या घरांतील मुलांची भाषा वेगाने पुढे सरकते. तीन वर्षांपर्यंत ११०० शब्द मुलांनी अवगत केलेले असतात. पाचव्या वर्षांपर्यंत किंवा प्राथमिक शाळेत प्रवेश करेपर्यंत, तीन ते पाच हजार शब्दांची साठवण या मुलांनी केलेली असते. साहजिकच त्यांना औपचारिक शिक्षण सहजतेने ग्रहण करता येते. अशी विकसित भाषा मुलांबरोबर असेल, तर भाषेकरवी होणाऱ्या त्यांच्या शिक्षणाचा दर्जा हमखास सुधारतो, तो वरच्या पातळीवर जातो. ग्रामीण, मागास घरांतील मुले एकूण शिक्षणात सुरुवातीपासूनच मागे पडायला सुरुवात होते ती त्यांच्या स्वतःच्या भाषेची तयारी पुरेशी झालेली नसते म्हणून. भाषा ऐकण्याप्रमाणेच भाषा बोलायला मिळणे ही गोष्ट भाषाविकासासाठी अत्यावश्यक गोष्ट असते. भरपूर बडबड करायला मिळणारी मुले वयाच्य तिसऱ्या वयापर्यंत तीन कोटी शब्द ऐकतात आणि बोलतात. ग्रामीण व त्यातही आदिवासी भागांत हे प्रमाण कितीतरी कमी असणार.

**बालशिक्षणाच्या संधींचा अभाव :**

सांस्कृतिक व भाषिक संधींचे मागासलेपण काही प्रमाणात तरी, खास प्रयत्न करून, शास्त्रीय बालशाळांमधून कमी करता येते आणि असे झाले तर शाळेत सहाव्या वर्षी प्रवेश करणारी मुले अधिक 'पूर्वज्ञान' घेऊन तेथे जातील; त्यातून त्यांची पुढील शिक्षणाची वाट अधिक सुकर होईल. बालशिक्षण म्हणजे मुलांचे पहिल्या सहा वर्षांपर्यंतचे शिक्षण होय. यालाच शालेयपूर्व, शालापूर्व शिक्षण (सरकारी शब्द 'पूर्वप्राथमिक') म्हणूनही संबोधले जाते. मुलांचे शिक्षण या वयात घरी व आजूबाजूच्या परिसरात आपोआप होतच जाते. यालाच 'सहज शिक्षण' (informal education) म्हणून संबोधले जाते. यांव्यतिरिक्त साधारणपणे तीन ते सहा या वयोगटासाठी बालशाळा चालविण्याची प्रथा जगभर पसरली आहे. आपल्याकडे केजी, नर्सरी, मॉंटेसरी अशा नावांनी, प्रामुख्याने शहरांमधून व इंग्रजी माध्यमांमधून अशा शाळा चालविल्या जातात. खेड्यांमध्ये मराठीतून चालणाऱ्या 'बालवाड्या' असतात. सरकारने खास ग्रामीण मुलांसाठी लाखोने 'अंगणवाड्या' उघडल्या आहेत. मुलांची एकाच वेळी आरोग्याची नि शिक्षणाची काळजी घेतली जावी, असा हेतू अंगणवाड्यांच्या योजनेचा आहे.

शास्त्रीय बालशिक्षण महत्त्वाचे असते; कारण, हे वय शिक्षणाच्या दृष्टीने महत्त्वाचे असते. हे मेंदूघडणीचे वय असते, हे सर्व क्षमतांच्या विकासाचे वय असते. भाषा आणि इतर गोष्टी, मुले याच वयात वेगाने आत्मसात करतात. त्यामुळे त्यांनी आत्मसात कराव्यात अशा सवयी, गुण, मूल्ये, भाषा, स्वावलंबन या किंवा अशा अनेक गोष्टी चांगल्या बालशाळा देऊ शकतात. पण अशा बालशाळाच खेड्यांमधून नाहीत. सरकार, प्रयत्नपूर्वक या वयातील सारी मुले, दिवसातले काही तास अंगणवाड्यांमध्ये अडकवते. त्यांना खिचडी देते, लसीकरण करते; पण बालशिक्षणापासून मात्र वंचितच ठेवते. कारण, अंगणवाडीसेविकांनाच शास्त्रीय बालशिक्षणाचे प्रशिक्षण व सरावही नसतो. साहजिकच, शहरांतील शास्त्रीय बालशिक्षणाची पार्श्वभूमी घेऊन येणाऱ्या मुलांच्या स्पर्धेत ग्रामीण मुले मागे पडतात. असेही म्हणता येईल की, अगदी बालवयातील शिक्षणापासून त्यांचे हे 'मागे पडणे' सुरू होते.

बालवयात क्षमताविकासाच्या संधी मिळणाच्या दृष्टीने शास्त्रीय बालशिक्षण हे एक महत्त्वाचे सामाजिक-शैक्षणिक क्षेत्र आहे. महत्त्वाचे असले, तरी ते तेवढेच दुर्लक्षित क्षेत्र आहे. दुर्लक्षित असले तरी ते दुर्लक्षित असता कामा नये. समाजाने ग्रामीण बालशिक्षणातच फार मोठी गुंतवणूक करायला हवी आहे. इतर कोणत्याही भौतिक गुंतवणुकीवरील परताव्यापेक्षा (आर्थिक व सामाजिक लाभ) बालशिक्षणावरील गुंतवणुकीचे फायदे मोठे आहेत. राष्ट्रातील भांडवलगुंतवणुकीचे हे एक प्रभावी क्षेत्र आहे, हे अलीकडच्या शैक्षणिक अर्थशास्त्रातील संशोधनावरून सिद्ध झाले आहे. मुलांना बालशिक्षण मिळणे, ते शास्त्रीयतेवर आधारलेले असणे आणि ते सार्वत्रिक रीत्या शहरी-ग्रामीण मुलांना उपलब्ध होणे यासाठी नियोजन

होणे गरजेचे आहे.

**कृतिशील शिक्षणसंधी :**

लहान वयातच जेव्हा औपचारिक (formal) शिक्षण सुरू केले जाते, तेव्हा अनिवार्यपणे शिक्षण हे कृतिशीलच असावे लागते. 'करून शिकणे' ही खरेतर शिकण्याची आणि शिकलेले कायमचे लक्षात ठेवण्याची सर्वोत्तम पद्धती आहे. लहान वयात तर तिचे महत्त्व विशेषच असते. कारण, शिकण्याच्या या पद्धतीचा संबंध बालकाच्या मेंदूच्या घडणीशी असतो. शिकणे, एखादी गोष्ट करता येणे, लक्षात ठेवणे आणि शिकलेल्याचा आठवून प्रत्यक्षात हवा तेव्हा उपयोग करणे या गोष्टी मेंदूमधील पेशींची परस्परबांधणी होण्यावर अवलंबून असतात. संशोधन असे सांगते की, अशी बांधणी होणे, हे शारीरिक हालचाल मुक्तपणे व भरपूर होत राहण्याशी जोडलेले असते; तसेच ते बौद्धिक दृष्ट्या स्वतःहून काहीतरी करीत जाण्याशी संबंधित असते. ऐकून शिकण्यापेक्षा करून शिकणे जास्त चांगले लक्षात राहते, हा सर्वांचा अनुभवही आहेच. ग्रामीण भागातील शालेय शिक्षणाला असे कृतिशील बनविण्यात प्रामुख्याने दोन ठळक प्रश्न आहेत. एक आहे, शैक्षणिक साधनांच्या मुबलक उपलब्धतेचा तर दुसरा आहे, तत्संबंधीच्या शिक्षकांच्या कौशल्यप्राप्तीचा व त्यासाठीच्या प्रशिक्षणाचा.

**शैक्षणिक साधनांच्या उपलब्धतेचा प्रश्न :**

लहान वयात कोणतीही गोष्ट, कोणताही विषय, विषयातील कोणताही घटक , 'करून' शिकताना, शैक्षणिक साधनांचा उपयोग करणे कमालीचे उपयुक्त ठरते, हे आता शिक्षणक्षेत्रात काम करणाऱ्यांना चांगले माहीत झाले आहे. शिकण्यासाठी, घटकांनुरूप शैक्षणिक साधने (खेळ) तयार करणे व वापरणे याला किमान दोनशे वर्षांचा तरी इतिहास आहे. फ्रोबेल (१८५२), मॉंटेसरी (१९५२) यांनी निर्माण केलेली साधने आजही जगभर वापरात आहेत. भारतात, गिजुभाई बधेका (१८८५-१९३९), ताराबाई मोडक (१८९२-१९७३), अनुताई वाघ (१९१०-१९९२) यांनी विविध प्रकारची व अनेक शैक्षणिक साधने कल्पकतेने तयार करून वापरली. ग्राममंगल संस्थेने निर्मित व संकलित केलेली शेकडो साधने काही शाळांतून वापरली जात आहेत. मुलांचे यांतून किती चांगले शिक्षण होते, याचा अनुभवही या शाळा घेत आहेत.

ग्रामीण भागाचा या संदर्भातील नेमका प्रश्न असा आहे की, अशा शैक्षणिक साधनांची त्यांच्या अंगणवाड्यांतून व शाळांमधून वानवाच आहे. वास्तविक अलीकडे सरकारने काही साधने स्वतःच्या अखत्यारीत तयार करून त्यांचा शाळांना पुरवठा करण्यास सुरुवात केली आहे. तरीही त्यांचा पुरेसा पुरवठा असणे, सर्व विषयांच्या जवळजवळ सर्वच घटकांना कवेत घेतील अशी साधने मोठ्या संख्येने उपलब्ध होणे आणि त्यांचा दैनंदिन शिक्षणात सातत्याने वापर होणे या गोष्टी अभावानेच आढळतात. शिवाय अशी साधने पुन्हा पुन्हा तयार करणे वा खरेदी करणे, शिक्षकांनी अशा साधनांच्या धर्तीवर कल्पकतेने आपणहून साधने तयार करणे हे अजूनही घडत नाही. मुळात, 'साधनांधारित शिक्षण' ही संकल्पनाच ग्रामीण भागातील शाळांच्या भूमीत रुजलेली नाही. त्यामुळे अक्षरशः हजारो मुले अशा शिक्षणापासून वंचित राहून अजूनही जुन्याच पंतोजी पद्धतीने शिकत राहिलेली आहेत.

आधुनिक रचनावादी शिक्षणप्रणालीचे 'साधनांधारित शिक्षण' हे एक मोठे बल आहे. किंबहुना, सांधनांविहीन शिक्षण आणि (तरीही) रचनावादी शिक्षण या गोष्टी परस्परविरोधातच जातात. रचनावादी वर्ग हा नेहमीच, मुलांच्या निवडींना वाव देणारा, साधनसंपन्न असा वर्ग असतो. ग्रामीण मुले या शिक्षणाच्या मुक्त पाण्यात विहार करू लागलेली नाहीत, हीच आपली खंत आहे.

**शिक्षकांच्या प्रशिक्षणाचा प्रश्न :**

शिक्षणातील परिवर्तन, तेही पायाभूत परिवर्तन ही सोपी गोष्ट नाही. परिवर्तनाच्या संकल्पनेमागील तत्त्वज्ञान समजावून घेणे, मूलतत्त्वे आणि व्यावहारिक तत्त्वे समजावून घेणे, त्यांकरवी स्वतःची शिक्षणाकडे पाहण्याची दृष्टी तयार होणे, त्या दृष्टीतून विद्यार्थ्यांकडे नि त्यांच्या दैनंदिन शिकण्याच्या प्रक्रियेकडे वळणे, त्याची सवय अंगीकारणे अशा कित्येक गोष्टी शिक्षकाच्या पातळीवर व्हाव्या लागतात. यासाठी शिक्षकवर्ग सजग असायला हवा, हे तर आहेच; शिवाय या सर्व गोष्टींबद्दलचे त्याचे शिक्षण-प्रशिक्षणही बळकटपणे व्हावे लागते. शिक्षक जर मनाने पुरेसा तयार नि आवश्यक तेवढा प्रशिक्षित

नसेल, तर ती रचनावादी शिक्षणाची सुरुवातही होऊ शकत नाही. याउलट, शिक्षक नव्या शिक्षणपद्धती आत्मसात करण्यास उत्सुक असेल आणि त्याने प्रशिक्षणही घेतलेले असेल, तर शाळांच्या बदलांची ग्वाही देता येते.

या सर्वच बाबतींत, आज तरी, ग्रामीण शाळांची परिस्थिती बिकटच आहे. लाखो मुलांच्या बालशिक्षणाची जबाबदारी पार पाडणारी अंगणवाडीसेविका ही स्वतः शास्त्रीय बालशिक्षणाच्या बाबतीत, सार्वत्रिक रीत्या, अडाणीच असते. अंगणवाडीसेविकेचे म्हणून तिला दिले जाणारे प्रशिक्षण तपासले तर त्याला बालशिक्षणाच्या शास्त्राची नि त्यावर आधारित व्यवहारांची सोयच नाही. तिला प्रशिक्षित करणाऱ्या प्रशिक्षकांनाही याची कुठलीही तज्ज्ञता नाही. अशा परिस्थितीत शिक्षिका-मुले ही आंतरक्रिया शैक्षणिक स्वरूपाची असतच नाही.

आदिवासी वा अन्य भागांतील आश्रमशाळा, बालगृहांतील मुले व त्यांचे शिक्षक, अगदी ग्रामीण भागांतील तथाकथित, कुत्र्याच्या छत्र्यांसारख्या उगवलेल्या इंग्रजी माध्यमाच्या शाळा व त्यांचे शिक्षक हेही रचनावादी शिक्षणपद्धतींपासून शेकडो योजने दूरच आहेत.

इतर खाजगी व सरकारी शाळांमधील शिक्षकांची, त्यांच्या शासकीय प्रशिक्षकांची गतही फारशी वेगळी नाही. ग्रामीण शिक्षकाला पूर्णतः सजग, प्रोत्साहित, प्रशिक्षित करण्याबाबत अनास्थाच अधिक आहे. यातून अंतिमतः मुलांचेच नुकसान होत राहते. आमची ग्रामीण मुले मागेच राहतात.

**मानसिकता घडविण्याचा प्रश्न :**

शिक्षण हे जरी विद्यार्थ्यांचे होणार असले, तरी त्याचा होणारा व्यवहार हा अनेक घटकांशी संबंधित असतो. शिक्षक हा त्यांमधील प्रमुख घटक असला, तरी तो एकमेव घटक नसतो. विद्यार्थ्यांचे पालक हाही तितकाच महत्त्वाचा घटक असतो. पुन्हा तो पालकवर्ग, ज्या छोट्याशा समाजघटकाशी संबंधित असतो, त्या समाजगटाचा प्रामुख्याने त्यांच्या आचार-विचारांवर प्रभाव असतो. विद्यार्थ्यांच्या शिक्षणाला दुरून प्रभावित करणारा हा घटक असतो. विशिष्ट प्रदेशातील एकूण सामाजिक वातावरणही (त्यातील पुढारी, नेते, परंपरा, आर्थिक व सामाजिक स्तर इ.) शिक्षणाला वळण देण्याचे काम करीत असतात. त्यामुळे, जेव्हा आपण शिक्षणातील परिवर्तनाचा प्रस्ताव समोर ठेवतो, तेव्हा एकूण समाजाचीच त्यासाठी तयारी असावी लागते. नव्या विचारांसाठीच्या सामाजिक प्रबोधनाचेच हे क्षेत्र असते. या क्षेत्रात कार्यकर्त्यांचीच वानवा आहे.

**शिक्षक-संस्थाचालक यांच्या मानसिकतेचा प्रश्न :**

'शाळा'नामक संस्थेचा विचार करताना, शिक्षक व संस्थाचालक हे दोन घटक विद्यार्थ्यांच्या दैनंदिन शिक्षणावर प्रभाव पाडणारे प्रमुख घटक आहेत, असे लक्षात येईल. शिक्षक हेतर प्रत्यक्षपणे आणि रोजच विद्यार्थ्यांच्या संपर्कात असतात, त्यामुळे त्यांचा प्रभाव हा प्रत्यक्ष प्रभाव असतो. तर, संस्थाचालक हे संस्थेचे धोरण आखणारे, निधी पुरविणारे आणि शिक्षकांची नेमणूक करणारे असल्यामुळे त्यांचा अप्रत्यक्ष प्रभाव विद्यार्थ्यांच्या शिक्षणावर पडत असतो. दैनंदिन व्यवहारात मात्र, काही अपवाद वगळता, हे संस्थाचालक विद्यार्थ्यांच्या संपर्कात नसतात. तरीही त्यांच्यात नि शिक्षकांच्यात प्रयत्नांची एकवाक्यता असावी लागते. पण हे असे असतेच असे नाही. त्यामुळे नव्या शिक्षणाबाबत शिक्षकांचे प्रशिक्षणच केवळ पुरेसे नाही, तर ते जे काही वर्गावर्गांमधून करणार आहेत, ते व त्यामागील भूमिका संस्थाचालकांना समजलेली व पटलेली असावी लागते.

खाजगी संस्थाचालकांबाबत एक वेगळाच प्रश्न अस्तित्वात आहे. बऱ्याचदा हे लोक समाजातील प्रतिष्ठित नि वेगवेगळ्या क्षेत्रांत यशस्वी जीवन जगलेले असतात. एका सामाजिक भावनेने, निस्वार्थ पद्धतीने ते शिक्षणक्षेत्रात काम करतातही; पण त्यांना शिक्षण समजत असतेच असे नाही. किंबहुना आपण शिक्षणात काम करणार असू, तर आपल्याला शिक्षण कळलेच पाहिजे, हेही त्यांना कळत नसते. त्यामुळे या वर्गाचे नवशिक्षणाचे प्रबोधन हा एक कळीचा प्रश्न आहे.

ग्रामीण भागात 'सरकार' हाच सर्वांत मोठा संस्थाचालक आहे. प्रत्यक्षपणे जिल्हा, तालुका, गाव या स्तरांवर काम करणारे शिक्षणक्षेत्रातील कर्मचारी स्वतःला 'अधिकारी' म्हणवून घेत असतात. शालेय स्तरांवरची धोरणे ते राबवत असतात; त्यात स्वतःच्या कल्पनाही ते वापरत असतात. त्यांची काही वेळा सक्तीही ते करतात.

अनुक्रमणिका

शिक्षकांची प्रशिक्षणेही करतात; पण त्यांनी शिक्षण समजावून घेतलेले असतेच असे नाही. या मध्यस्थ घटकाला शिक्षणाचे धोरणकर्ते आणि शिक्षण व्यवहारात उतरवणारे शिक्षक यांच्यामधला दुवा म्हणून काम करायचे असते. त्यांच्या असमजेमुळे सारी शिक्षणव्यवस्था ग्रामीण भागात दुर्बल असलेली दिसून येते. त्याचेच प्रतिबिंब शाळा-शाळांमधील शिक्षणाच्या दर्जाहीनतेत बऱ्याचदा दिसून येते. त्यामुळे या मध्यस्थ घटकाचे शिक्षणविषयक प्रबोधन हा ग्रामीण भागातील एक कळीचा शैक्षणिक प्रश्न आहे.

**पालक-प्रबोधनाचा प्रश्न :**

पालक-प्रबोधनाचा प्रश्न जेवढा ग्रामीण भागात गंभीर आहे, तेवढाच तो थोड्याफार फरकाने, शहरांतही गंभीर आहे. पालक हा आपल्या पाल्याचा स्वामी असतो. त्याच्या शिक्षणाविषयीचे सर्व निर्णय घेण्याचे अधिकारही पालकांचे असतात. मुलांच्या गरजा, त्यांच्या क्षमता, आवडी-निवडी यांचे कुठलेच भान नसलेला पालक निर्णय घेताना स्वतःच्या भूतकाळातील शिक्षणविषयक अनुभवांच्या व कल्पनांच्या आधारे तसेच आजूबाजूच्या संबंधित समाजातील प्रवाहात पाहून निर्णय घेत असतो. त्यामुळे ते निर्णय सयुक्तिक असतातच, असे नाही. पालकांनी मुलांच्या शिक्षणाविषयीचे निर्णय घेण्यापूर्वी मूल समजावून घ्यायला हवे. मूल निसर्गतः असते कसे, वाढते कसे आणि स्वतःच्याच प्रेरणेने शिकते कसे, हे समजल्याशिवाय पालक होणे व्यर्थच ठरते.

वास्तविक पालकांच्या अल्पवेळच्या शाळाच समाजात चालवायला हव्यात. 'महाराष्ट्र बालशिक्षण परिषदे' सारख्या संस्था, केवळ पालकांच्या शिक्षणविषयक प्रबोधनाच्या कार्याचा वसा घेऊन काम करताना दिसतात. पण, हे काम खूपच सबल करण्याची गरज आहे. जिल्हावार, तालुकावार व त्यांच्याही खाली गावागावांतून पालकप्रबोधनाचे वर्ग तरी चालवावे लागतील किंवा कार्यक्रम तरी होत राहावे लागतील. पालकांना मुले 'कळली' तर त्यांचे शिक्षणही कळेल; आणि शिक्षण कळले तर मुलांना त्यांची योग्य मदतही मिळत राहील.

ग्रामीण भागाला, तेथील माणसाला कायम दुय्यम मानण्याची आपली सवय शहरवासीयांनी मोडली, तर हे प्रश्न सुटू शकतात. पैशांचा आणि भांडवलाचा प्रवाह जो नेहमीच खेड्यांकडून शहरांकडे वाहतो, त्याला उलटे वळण देण्याची गरज आहे. शिक्षणातून माणूस घडविण्याची उमेद आपण राखत असू, तर खेड्यांतील शिक्षणावर लक्ष अधिक प्रमाणात द्यावे लागते. खेड्याखेड्यांमधील आणि मुलामुलांमधील सुप्त शक्ती जागृत करून तिला उत्पादक व उपयोगी दिशा द्यावी लागेल. त्यासाठी कार्यकर्ते, पैसे आणि अन्य बौद्धिक व कौशल्यांची साधने शहरांनी पुरवायला हवीत.

भौतिक भांडवलापेक्षा मानवी भांडवलातील गुंतवणूक अधिक उत्पादक असते, हे १९६० च्या दशकाने जगाला दाखवून दिले. औद्योगिक युगापेक्षा ज्ञानयुग हे अधिक लाभदायक ठरणार आहे, हे १९६० च्या दशकाने आपल्या नजरेसमोर आणले आहे. उच्च शिक्षणापेक्षाही प्राथमिक शिक्षणातील व त्यातही बालशिक्षणातील गुंतवणूक व्यक्तीला आणि देशाला अधिक लाभदायक असते, हे २००० च्या दशकाने सिद्ध केले आहे. रचनावादी पद्धतीने सर्वच मुले अधिक चांगली कशी शिकू शकतात, हे २०१० च्या दशकाने दर्शवून आपल्यापुढे शास्त्रीय शिक्षणाच्या सार्वत्रिकीकरणाचे आव्हान ठेवले आहे. एक समाज म्हणून हे आव्हान आपण जाणीवपूर्वक स्वीकारले पाहिजे.

आलेली आव्हाने पेलण्याचे धैर्य दाखवतो, तोच जागरूक समाज होय!



**संपादकीय टीप :** 'मानववादाची विविध परिमाणे' हे प्रा. डॉ. प्रतिभा कामत यांचे पुस्तक 'नवभारता'तून क्रमशः प्रसिद्ध करीत आहोत. सदर पुस्तकाची प्रस्तावना या अंकात दिली आहे.

# मानववादाची विविध परिमाणे (प्रस्तावना)

प्रतिभा कामत

'मानववाद' ही प्रस्थापित तत्त्वज्ञानीय प्रणाली नाही. परंतु भिन्न भिन्न विचारप्रवाहांशी ठळकपणे किंवा सूक्ष्म धाग्याने जोडलेला तो एक जीवनविषयक दृष्टिकोण आहे. ऐतिहासिक दृष्ट्या ग्रीक प्रज्ञावंतांपासून २० व्या शतकातील विचारवंतांपर्यंत अनेक व्यक्ती ह्या संकल्पनेशी संबंधित आहेत. भौगोलिक दृष्ट्या इंग्लंड, अमेरिका आणि युरोपियन देश (२० व्या शतकात एम्. एन्. रॉय ह्यांच्या प्रभावामुळे भारत) एवढे क्षेत्र त्याने व्यापलेले आहे. वैचारिक प्रणालीच्या दृष्टीने विचार करता पेट्रार्क, लॉरेंझो व्हॅला, पिको डेला मिरांडोला, जॉन कोले, थॉमस मोर, प्रत्यक्षवादी उपयुक्ततावादी ज पॉल सार्त्र, कार्ल मार्क्स इ. अनेक विचारवंत मानववादाचा पुरस्कार करताना आढळतात.

मानववादाच्या सर्व छटांचे तपशीलवार विश्लेषण मी केलेले आहे, असा माझा दावा नाही. ह्या छोटेखानी पुस्तिकेच्या व्याप्तीच्या आणि उद्दिष्टाच्या आवाक्यात ते येत नाही. मानववाद ह्या संकल्पनेशी तार्किक दृष्ट्या संबंधित असलेल्या बहुआयामी तत्त्वज्ञानीय समस्यांचे थोडक्यात विश्लेषण करून सुसंगत अशी मानववादी भूमिका स्वीकारण्यातील अडचणी समजून घेणे हा ह्या ठिकाणी मुख्य उद्देश आहे.

मानववादाला तत्त्वज्ञानावरील पुस्तकांमध्ये स्वतंत्र स्थान नाही. काहींच्या मते मानववाद ही विचारप्रणाली नसून ती एक जीवनशैली आहे. मानववाद विशिष्ट अशा जीवनशैलीचा पुरस्कार निश्चितच करतो.परंतु त्याच्याशी संबंधित असणाऱ्या समस्या ह्या प्रस्थापित तत्त्वज्ञानीय सिद्धान्त आणि समस्या ह्यांतूनच उद्भवतात.

मानववादाची निश्चित आणि परिपूर्ण व्याख्या थोडक्यात देणे शक्य नाही. परंतु शब्दकोशातील व्याख्येप्रमाणे मानववाद हा मानवाचे मूल्य आणि आत्मसन्मान ह्यांवर भर देणारा विचारप्रवाह आहे. ह्या व्याख्येत मानवाचे श्रेष्ठत्व अधोरेखित केले गेल्यामुळे अनेक तत्त्वज्ञानीय सिद्धान्त आणि धार्मिक श्रद्धा ह्यांच्या ती विरोधात जाते. ह्या व्याख्येप्रमाणे मानववाद धर्म, अतीतवाद, यतिवाद नाकारतो. मानववाद ही एका अर्थाने प्रस्थापित मूल्यव्यवस्थेला दिलेली नकारात्मक प्रतिक्रिया आहे.

मानववाद हा जीवनाकडे बघण्याचा मानवकेंद्रित दृष्टिकोण आहे. मानववादाची मानवतावादाशी गल्लत करणे योग्य नाही. (दुर्दैवाने मराठीत Humanism याला अनेक ज्येष्ठ विचारवंतांनीही मानवतावाद म्हटलेले आहे.) मानवतावाद ही मूलतः देवशास्त्रीय आणि धार्मिक संकल्पना आहे. मानववाद येशू हा देवाचा पुत्र आहे हे मत मान्य करीत नाही. ह्याउलट, मानवतावाद हा देवाला खूश करण्यासाठी दया, औदार्य, कृपा, कनवाळूपणा ह्या गुणांचा अवलंब करण्याचा उपदेश करतो.

मानववादाचा खरा अर्थ समजून घेण्यासाठी ख्रिश्चन धर्माची पार्श्वभूमी लक्षात घेणे आवश्यक आहे. आजही प्रगत अशा पाश्चात्त्य देशांमध्ये धर्माचे आधिपत्य काही प्रमाणात आढळते. २० व्या शतकात १९७० च्या आसपास अमेरिकेतील एका राज्याला शाळेमध्ये डार्विनचा उत्क्रांतिवादाचा सिद्धान्त शिकविण्याची परवानगी मिळविण्यासाठी कोर्टात जावे लागले होते. कोर्टानेही परवानगी देताना ख्रिश्चन धर्मप्रणीत एक पर्याय म्हणून डार्विनचा सिद्धान्त शिकविण्याची परवानगी दिली. गर्भपात, गर्भनिरोधकांचा वापर ह्यांना कायदेशीर मान्यता मिळविण्यासाठी केवळ अमेरिकेतच नव्हे तर इंग्लंड व फ्रान्समध्येही सुधारकांना संघर्षाला सामोरे जावे लागले.

पुढील पानांमध्ये मानववादाच्या विविध आविष्कारांची चर्चा केलेली आहे.

विज्ञानपूर्व काळात धर्म हा नीतिमत्तेचे अधिष्ठान मानला गेलेला होता. नीतिमत्तेविषयीच्या संदर्भात तत्त्वज्ञानीय पातळीवर एक प्रश्न उपस्थित होतो तो असा —'मी नीतिमान का असावे?' हा प्रश्न तसा

सनातन आहे. प्लेटोच्या संवादात तो उपस्थित केला गेला आहे.

हा प्रश्न उपस्थित होण्याचे कारण असे की, प्रत्यक्ष व्यवहारात नीतिमान माणसांना अनेक समस्यांना सामोरे जावे लागते. अनैतिक मार्गाने वागणारी माणसे मात्र सर्व प्रकारचे सुखोपभोग घेत असतात. सॉक्रेटिससारख्या शहाण्या, प्रज्ञावंत माणसालाही नीतिमत्तेच्या समर्थनार्थ आत्म्याच्या अमरत्वाच्या तत्त्वाचा आधार घ्यावा लागलेला आहे. प्रत्येक गोष्टीचा अंत येथेच, ह्याच जीवनात होत नाही. मृत्यूनंतरही जीवन असते. आपल्या कृत्यांच्या नैतिक/ अनैतिक गुणांनुसार आपणास पुढील जीवनात बक्षीस/ शिक्षा मिळते. आत्म्याच्या अमरत्वावरील श्रद्धेशी ईश्वरावरील श्रद्धा जोडलेली असते. आत्मा आणि ईश्वर ह्यांवरील श्रद्धेमुळे माणसाला ह्या जीवनातील नैराश्यावर मात करता येते. भारतीय तत्त्वज्ञानात ह्या संकल्पनांचे तपशीलवार आणि सूक्ष्म दृष्टिकोणातून विश्लेषण केलेले आढळते. प्राचीन काळी इजिप्शिअन लोकांनी मृत्यूनंतरच्या जीवनाचा टोकाला जाऊन विचार केला होता. आणि म्हणूनच मृत व्यक्तीला मृत्यूनंतरच्या जीवनात आवश्यक व उपयुक्त असलेल्या वस्तू- उदा., कपडे, अन्न, मद्य, सुगंधी द्रव्ये, नोकर इत्यादी- त्याच्या मृत शरीराबरोबर पुरल्या जात.

ऐतिहासिक दृष्ट्या विचार करता ईश्वरविषयक ही संकल्पना केवळ विश्वविषयक स्पष्टीकरणातच नव्हे, तर मानवी जीवनातही महत्त्वाची संकल्पना होती. कांटसारख्या विचारवंताच्या विश्लेषणातही नीतिमत्तेच्या संदर्भात इच्छास्वातंत्र्याबरोबरच 'ईश्वर' आणि 'आत्म्याचे' अमरत्व ह्या संकल्पना महत्त्वाच्या मानल्या गेल्या आहेत. नीतिमत्तेसाठी ह्या संकल्पना अनिवार्य असतील, तर नीतिमत्तेची मुळे अतीत विश्वात रुजलेली आहेत, असे म्हणावे लागेल.

सर्वसामान्य माणसाला ह्या अतीताचे ज्ञान नसते. म्हणूनच असे ज्ञान असण्याचा दावा करणाऱ्या पुजारी-मंडळींकडून सामान्य लोकांना मार्गदर्शन केले जाते. वर्तणुकीचे विविध नियम धर्मग्रंथांत सांगितलेले असतात. ह्या नियमांचा भंग केल्यास अशा व्यक्तींना शिक्षा केली जात असे. दैनंदिन जीवनात मार्गदर्शन करण्याबद्दल पुजाऱ्यांना सामान्य माणसे अन्न, वस्त्र, पैसे, दागदागिने इ. वस्तू देणगी म्हणून देत असत. अशा देणग्या देणे ही गोष्ट आरंभीच्या काळात ऐच्छिक होती; परंतु हळूहळू सामान्य माणसांकडून अशा देणग्या जबरदस्तीने वसूल करण्यात येऊ लागल्या. ह्यामुळे पुजारीवर्ग एवढा श्रीमंत झाला.की, राज्यकर्त्यांवरही दबाव निर्माण करण्यास त्याने सुरुवात केली. प्राचीन ईजिप्तमध्ये ही पुजारीमंडळी श्रीमंत जमीनदार होती आणि राज्यकर्त्यांमध्येही त्यांना विरोध करण्याचे धैर्य नव्हते. त्यांना आव्हान देण्याचे काम इ. स. पू. १३ व्या शतकात एकाच राज्यकर्त्याने केले. तो राज्यकर्ता म्हणजे इरवनॅतॉन. त्याच्या एकूण कारकिर्दीचा विचार करता मानववादी विचार आणि मानववादी जीवनशैली ह्यांचा तो पहिला उद्गाता होता, असेच म्हणावे लागेल.

ख्रिश्चन धर्माने पुजारीवर्गाला जास्तीत जास्त आश्रय दिला. चर्च आणि पुजारी ह्यांनी युरोपमध्ये संपूर्ण मानवी जीवनावर एक हजार वर्षांपेक्षा अधिक काळ हुकमत गाजवली. माणूस म्हणजे स्वतःच्याच पापाचा बळी ठरल्यामुळे पतित जीव आहे ही ख्रिश्चन धर्मातील मूलभूत कल्पना ऐतिहासिक दृष्ट्या नवीनच होती. ग्रीक तत्त्वज्ञानात ही कल्पना आढळत नाही. रोमन चर्चवर आधिपत्य गाजवणाऱ्या ख्रिश्चन धर्माचा संदेश देणाऱ्या धर्मग्रंथाची भाषा लॅटिन होती. बहुतेक सामान्य लोकांना लॅटिन भाषा अवगत नव्हती. त्यामुळेच पुजारीवर्ग ईश्वर आणि माणूस ह्यांच्यामध्ये दलाली करण्याचे काम करू लागला.

ख्रिश्चन धर्माच्या बाबतीत आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे कॉन्संटाइनने ख्रिश्चन धर्म स्वीकारल्यापासून राजसत्ता आणि धर्मसत्ता एकत्र आल्या. राजसत्तेचा आधार असलेला ख्रिश्चन धर्म हा एकेश्वरवादी धर्म असल्यामुळे इतर धर्मांबद्दल त्याने कमालीची असहिष्णुतेची भूमिका स्वीकारली. 'ख्रिस्तपूर्व' (Pagan) हा हेटाळणीचा विषय ठरला. चर्चविरुद्ध जाणाऱ्या प्रत्येकाला पाखंडी समजले गेले. धर्माची आज्ञा न पाळणे हे पाप समजले जाऊ लागले. ह्या पापातून मुक्त होण्याचा मार्ग म्हणजे धर्मोपदेशकाकडून पापमुक्तीचे पत्रक घेणे ज्याला Indulgences म्हटले गेले. अशा पत्रकाबद्दल संबंधित व्यक्तींकडून पैसे घेतले जात. अनेकदा तशी जबरदस्तीही

केली जाई.

ख्रिश्चन धर्माच्या शिकवणुकीप्रमाणे स्वतःच्या पापामुळे पतन होऊन माणूस ह्या ग्रहावर, पृथ्वीवर आलेला आहे. त्यामुळेच त्याला वासनांच्या वादळाला सामोरे जावे लागते. इतर सजीव प्राण्यांपेक्षा माणूस फार वेगळा आणि श्रेष्ठ आहे. वासना आणि आत्मा ह्यांतील द्वंद्व संपूर्ण ख्रिश्चन धर्माच्या विचारात आढळते. ख्रिश्चन धर्माचे प्रामाणिकपणे पालन करावयाचे असल्यास वासनांचे दमन करणे आवश्यक आहे. मानवी जीवनाचे संपूर्ण अस्तित्व आत्मा आणि वासना ह्यांमधील संघर्षाने व्यापून राहिलेले आहे. केवळ ईश्वरी कृपेनेच आत्म्याचा विजय होतो. आत्मा आणि वासना ह्यांमधील तुंबळ संघर्षाचे तपशीलवार वर्णन सेंट ऑगस्टिनच्या लिखाणात आढळते.

(वास्तविक पाहता ख्रिश्चन धर्माचा विकास हा ग्रीक विचारप्रणालीचे आधिपत्य असलेल्या जगात झाला. सेंट ऑगस्टिनपासून थॉमस ॲक्वायनासपर्यंत ख्रिश्चन धर्माच्या धुरिणांवर ग्रीक-रोमन विचारांचा पगडा होता. परंतु जे ख्रिस्तपूर्व - अर्थात ख्रिश्चन नसलेले- आहे ते सर्व त्याज्य आहे, असा प्रचार ख्रिश्चन धर्माच्या प्रचारकांनी केला. वैचारिक दृष्ट्या सेंट ऑगस्टिनने वर्णन केलेल्या वासना आणि आत्मा ह्यांतील संघर्ष प्लेटोच्या तत्त्वज्ञानातील दोन कल्पनाविश्वांतील –अनुभवनिष्ठ व अनुभवातीत– भेदांवर आधारलेला आहे. पुनरुज्जीवनाचा कालखंड हा ग्रीक तत्त्वज्ञानाने आणि संस्कृतीने प्रभावित झालेला कालखंड आहे. ख्रिश्चन धर्माच्या काही शिकवणींविरुद्ध मतांची बीजे ह्याच कालखंडात पेरली गेली आणि कदाचित ह्यामुळेच वैफल्यग्रस्त, पराभूत भावनेने टरटुलीअनने म्हटले- 'जेरुसलेम अथेन्सचे काहीही देणे लागत नाही.')

ख्रिश्चन धर्माच्या शिकवणुकीप्रमाणे वासनांचे दमन करून संन्यस्त वृत्तीचा अवलंब करणे हा जीवनाचा आदर्श मानला गेला, तरी लढवय्ये, शेतकरी, कष्टकरी ह्यांना ह्या मार्गाचा अवलंब करणे शक्य होत नाही. चर्चच्या सेवेत राहून संन्यस्त वृत्तीने जीवन व्यतीत करणारा धर्मोपदेशक आदर्श मानला गेला. परंतु सर्वसामान्य माणसाला असे जीवन जगणे शक्य नाही. ह्या जीवनातील वासनांशी निगडित आनंद आणि सुख ह्यांपासून सामान्य माणूस दूर राहू शकत नाही. परंतु असे जीवन जगत असताना त्याच्या मनात आपण करीत आहोत ते पाप आहे, अशी बोचरी जाणीव असते. तशी ती असावयास हवी.

एकूण विचार करता असे आढळते की, ज्या युरोप आणि आसपासच्या देशांत ख्रिश्चन देवशास्त्र आणि चर्च ह्यांचे आधिपत्य एक हजार वर्षांहून अधिक काळ होते, त्या ठिकाणचा समाज हा बंदिस्त समाज होता.

ह्या बंदिस्त समाजाच्या बंदिस्त विचारप्रणालीला आणि जीवनशैलीला धक्का देण्याचे काम मानववादी विचारवंतांनी केले. ह्या मानववादी विचारवंतांच्या विचारप्रवाहाचे सूत्र एकच असले, तरी विविध कालखंडांतील ह्या विचारवंतांच्या विश्लेषणाचे आविष्कार मात्र भिन्न भिन्न आहेत. आणि म्हणूनच त्यांचे विभाजन सात विभागांत केलेले आहे.

ह्या विविध आविष्कारांचे मध्यवर्ती सूत्र एकच असल्यामुळे आणि परस्परांच्या विचारप्रवाहातील आदान-प्रदानामुळे काही बाबतींत पुनरुक्ती अटळ ठरलेली आहे.

**मानववादाचे विविध आविष्कार**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| पुनरुज्जीवनकालीन मानववाद<br>ग्रीक मानववाद<br>धार्मिक मानववाद | मानव | | वैज्ञानिक मानववाद<br>भौतिकवादी मानववाद<br>अस्तित्ववाद व मानववाद | आविष्काराचे विविध रंग |
| निसर्गवाद × निसर्गातीत वाद | नियतवाद × इच्छास्वातंत्र्य | वैज्ञानिक × विज्ञानविरोधी | ईश्वरवाद × निरीश्वरवाद | मतभेदाचे मुद्दे |
| अतीतवाद | संन्यस्तवृत्ती | पाप | प्रस्थापित व्यवस्थेविरुद्ध प्रतिक्रिया | |
| मानव | नैतिक मूल्ये | आधारभूत तत्त्वे | | |

अनुक्रमणिका

# इतिहास आणि लोकसंस्कृती : परस्पर अनुबंध

द. ता. भोसले

इतिहासलेखन आणि संशोधन या दृष्टीने जिव्हाळ्याचा विषय असलेल्या या लेखामध्ये आपणाला प्रामुख्याने चार गोष्टींवर भर देऊन विवेचन करता येईल.– (१) इतिहासाविषयी आपली धारणा काय असते – काय असावी, (२) प्रचलित इतिहासलेखनातील जाणवणाऱ्या मर्यादा, (३) त्यासाठी लोकपरंपरा आणि लोकसंस्कृतीच्या अभ्यासाची गरज आणि (४) त्यातून इतिहासाला मिळणारे योगदान, हे ते चार घटक होत.

कालपरवापर्यंत इतिहासाविषयी आपली भूमिका आणि धारणा फार मर्यादित अशा स्वरूपाची होती. ठळक अशा राजकीय घडामोडींचीच आपण दखल घेत होतो. त्यांचीच नोंद करीत होतो. आणि तोच आपला इतिहास असे समजत होतो. पण महत्त्वाच्या राजकीय घडामोडी म्हणजे इतिहास नव्हे. अथवा एखाद्या राजघराण्याची वांशिक कारकिर्द सांगणे म्हणजे इतिहास नव्हे. लढाया, चकमकी, तह, करारनामे आणि सनावळ्या म्हणजे खरा इतिहास नव्हे. राजाचे जाहीरनामे, सेनापतीचे पराक्रम, राण्यांचे विलास, राजकन्येचा विवाह, मंदिरांची निर्मिती, त्यात घुमणारे मंत्रघोष, आणि रंगमहालातील नृत्याचे झंकार म्हणजे इतिहास नव्हे. परिपूर्ण आणि निर्दोष इतिहासामध्ये मोठ्या घटनांच्या बरोबरच समांतर असणाऱ्या छोट्या घडामोडीही याव्या लागतात. उदाहरणानेच बोलायचे झाल्यास १८५७ सालच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या संदर्भात इतिहास फक्त आपणाला नानासाहेब, राणी लक्ष्मीबाई आणि तात्या टोपे यांनी केलेला पराक्रम, दिलेली कडवी झुंज यांचीच माहिती पुरवितो. पण त्याच काळात, स्वातंत्र्यासाठी आणि ब्रिटिशांनी लादलेल्या अन्यायी निर्बंधाविरुद्ध पराक्रमी भागोजी नाईक या आदिवासी नेत्याने सुरू केलेल्या रणकंदनाची आपण दखल घेत नाही. या भागोजी नाईकाने नगर आणि नाशिक जिल्ह्यांतील सात हजार आदिवासी तरुणांना एकत्र करून १८५५ ते १८५९ या चार वर्षांत ब्रिटिश सत्तेला सळो की पळो करून सोडले होते. स्वतःच्या पराक्रमाने ब्रिटिश सैन्याचे पाच प्रमुख अधिकारी यमसदनाला पाठवून जबरदस्त दहशत बसविली होती. त्याचा हा पराक्रम जराही नगण्य म्हणता येणार नाही. तरीही त्याच्या बलिदानाची दखल आपल्या इतिहासाने घेतलेली नाही. तीच गोष्ट शिवकाळातील उदाजी चव्हाण या पराक्रमी योद्ध्याची. ख्यातकीर्त असलेल्या धनाजी-संताजी यांच्या काळातच होऊन गेलेल्या या उदाजीने त्यांच्याइतकाच पराक्रम गाजविला होता. म्हणून तर त्याला 'हिंमतबहाद्दर' असा सन्माननीय किताब बहाल करण्यात आला होता. पण त्याच्या या पराक्रमाची आपल्या इतिहासाने घ्यावी तेवढी नोंद घेतली नाही, असेच म्हणावे लागेल. म्हणूनच मोठ्या राजकीय घटनांच्या बरोबरच त्या काळात होऊन गेलेल्या अशा घटनांचीही इतिहासाने नोंद घ्यायला हवी, असे म्हणता येईल,– असे म्हणता यावे.

याबरोबरच परिपूर्ण आणि निर्दोष इतिहास-लेखनासाठी सामाजिक स्थितिगतीचे यथातथ्य दर्शन घडायला हवे. सर्वसामान्य रयतेचे आणि उपेक्षितांचे जगणे व्यक्त व्हायला हवे. त्यांच्या सुखदुःखांचे दर्शन घडायला हवे. अनेकदा राजकीय आक्रमणांची तपशीलवार नोंद केली जाते. एखाद्या मोहिमेची मजल-दरमजल माहिती-देखील सांगितली जाते. पण त्या सैन्याने त्या वेळी रयतेशी जी गुंडगिरी केलेली असते, जो त्रास दिलेला असतो, त्याची साधी नोंदही केली जात नाही. अफजलखानाची प्रतापगडावरील स्वारी याचे एक उदाहरण म्हणून सांगता येईल. खानाचे सैन्य माणदेशातून वाईच्या दिशेने जात असताना माण नदीच्या काठी असलेल्या मलवडी आणि आसपासच्या खेड्यांतील शेतकऱ्यांच्या पिकांची नासधूस करीत व जाळपोळ करीत त्याने तो परिसर बेचिराख करून टाकला होता. आधीच दुष्काळाच्या आगीत होरपळून जाणाऱ्या या भागातील शेतकऱ्यांचे हातातोंडाशी आलेले पीक नष्ट झाले. भूक, उपासमार आणि अत्याचार यांची

शिकार व्हावे लागले. प्रतापगडावरील युद्धाचे इतिहासकथन करताना या सामाजिक स्थितिगतीचे दर्शनही इतिहास-लेखकाने घडविले पाहिजे. तरच तो परिपूर्ण आणि निर्दोष म्हणता येईल. थोडक्यात असे म्हणता येईल की, सामान्य माणसाचे जगणे, त्या जगण्यामागची प्रेरणा, त्या समाजाची श्रद्धास्थाने, त्यातून त्याला मिळणारी ऊर्जा आणि त्याच्यावर कोसळणारी संकटे या साऱ्यांचा मागोवा घेतला तरच तो परिपूर्ण इतिहास होऊ शकेल. म्हणजेच ज्ञात इतिहासाच्या मागचा लपलेला इतिहास उजेडात यायला हवा. शब्दांकित व्हायला हवा.

एखादे उदाहरणच घेऊन सांगायचे झाले, तर इतिहास संशोधकास एखादा शिलालेख सापडला असेल तर, (१) ज्याच्या आज्ञेने तो शिलालेख तयार झाला, त्याची माहिती यायला हवी. (२) त्या शिलालेखात जी आज्ञा किंवा आदेश अथवा दानपत्र असेल, त्याची माहिती देऊन त्याचे महत्त्व सांगितले पाहिजे. (३) तो आदेश वा आज्ञा का काढावी लागली, त्या स्थितीची आणि त्या काळच्या समाजाची माहिती यायला हवी. (४) जिथे तो शिलालेख सापडला, त्या स्थळाचे महत्त्व व वेगळेपण आपणाला सांगता आले पाहिजे. (५) ज्याने तो शिलालेख तयार केला, त्या कलावंताची माहिती देता आली तर तीदेखील द्यायला हवी. त्यातून इथल्या कलेची प्रगति-वैशिष्ट्येही आपणाला ज्ञात होऊ शकतील. आणि (६) या साऱ्या बाबींतून साकार झालेला युगधर्म ज्ञात झाला, तरच तो खरा आणि परिपूर्ण इतिहास ठरेल. त्याला समग्रता प्राप्त झालेली असेल.

सारांश, सम्राटाचा राजदंडावरचा हात, सेनापतीचा तलवारीवरचा हात, लेखणीचा हात, नांगरावरचा हात, मातीत राबणाऱ्या कष्टकऱ्याचा पाटी-घमेल्यावरचा हात, वादक-कलावंताचा हात आणि पूजेच्या तबकावरील हात या साऱ्यांचा एकात्म आविष्कार झालेल्या लेखनालाच आपण इतिहास म्हटले पाहिजे. हाच इतिहास साऱ्या समाजाचे संपूर्ण दर्शन घडविण्यास पात्र होतो, उपयुक्त ठरतो, यात शंका नाही.

**अशा इतिहासास पडणाऱ्या मर्यादा**

असे परिपूर्ण आणि निर्दोष इतिहासलेखन करताना कळत नकळत अनेक मर्यादा पडत असतात. अनेकदा खुद्द इतिहासलेखन करणाऱ्या लेखकाची भूमिका मर्यादित असते. त्याचा दृष्टिकोन मर्यादित असतो. आपल्या मराठी बखरींचे लेखन या प्रकारचे आहे. बखरलेखन करणाऱ्या या मंडळींना इतिहासाविषयीची शास्त्रशुद्ध कल्पना प्राप्त झालेली नसते. त्यांचा विद्याव्यासंग हा पुराणग्रंथ आणि अशाच धार्मिक ग्रंथांचा असल्याने तो आदर्श समोर ठेवूनच त्यांनी बखरलेखन केले; म्हणजेच इतिहासलेखन केले. त्यामुळे त्याला अतार्किकता आली; पुराणांची मांडणी आली. त्या लेखनासाठी कल्पकतेचा वापर करण्यात आला. म्हणूनच इतिहासाचार्य राजवाडे यांनी बखरींचे अस्सलपण नाकारले. इतिहासलेखनाला मर्यादा पडण्याचे दुसरे कारण म्हणजे रूढी आणि परंपरेचा पडणारा दबाव. आपल्या वैयक्तिक आणि सामाजिक जीवनावर पूर्वीपासून चालत आलेल्या इष्ट-अनिष्ट अशा रूढी-परंपरांचा प्रचंड दबाव असतो. बंधने असतात. त्यांचे उल्लंघन करण्याचे धाडस सामान्य माणसाला सहसा होत नाही. इतिहासलेखन करणारा माणूस या साऱ्या बंधनांचा स्वीकार करूनच जगत असतो. त्यातही राजेरजवाडे, संस्थानिक अशा थोर मंडळींच्या जीवनाशी निगडित असलेला प्रसंग कथन करताना आपोआपच त्याच्या लेखनावर मर्यादा पडतात. परंपरेच्या विरुद्ध लेखन करण्याचे धाडस त्याला दाखवता येत नसल्याने त्याच्या लेखनाला स्वाभाविकच मर्यादा पडतात. तीच गोष्ट लेखक जर एखाद्या राजाच्या आश्रयाने जगत असेल, एखाद्या संस्थानिकाचा आश्रित असेल, तर स्वामीने सांगितल्याप्रमाणेच त्याला आपले इतिहासलेखन करावे लागते. पानिपतचा युद्धसंग्राम ही तशी एकच घटना असली, तरी 'होळकरांची कैफियत' या बखरीत त्या पराभवाचे कारण वेगळे सांगितले आहे. तर दुसरा बखरकार त्या पराभवाची मीमांसा वेगळ्याच प्रकारे म्हणजे आपल्या स्वामीची बाजू घेऊन करीत असतो. सभासदाच्या बखरीमध्येही बखरकाराने शिवपुत्र संभाजीराजे यांच्यावर जे लेखन केलेले आहे, ते स्वामींच्या आदेशानुसार आणि स्वामींच्या इच्छेचा विचार करूनच झालेले आहे, हे आपणांस जाणवते. त्यामुळे खऱ्या, निर्दोष व परिपूर्ण इतिहासलेखनावर प्रचंड मर्यादा पडतात, हे नाकबूल करता येणार नाही.

इतिहासलेखनावर मर्यादा पडण्याचे चौथे कारण म्हणून धर्मकल्पनेचा प्रभाव हे सांगता येईल. व्यक्तिजीवन आणि समाजजीवन यांच्यावर धर्मविचार आणि धर्मभावनेचा असणारा प्रभाव अगदी वैदिक काळापासून तो गेल्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत आपण पाहत आलो आहोत. किंबहुना आजसुद्धा चंद्रावर माणसाने पाऊल ठेवले तरी चंद्राविषयीच्या, इतर ग्रहांविषयीच्या भ्रामक कल्पना कमी होत नाहीत. या धर्मभावनेने आणि धर्मबंधनाने माणसाचे सारे जीवनच पार बंदिस्त करून टाकले होते. त्यामुळे इतिहासातील घडामोडींवर त्याचा परिणाम झाला. इतिहासलेखनावर त्याचा परिणाम झाला. शुभ मुहूर्ताच्या भ्रामक श्रद्धेत अडकलेल्या आमच्या पराक्रमी योद्ध्यांना पानिपतावर दारुण पराभव स्वीकारावा लागला, हे या धर्मभावनेचेच उदाहरण म्हणावे लागेल. पुण्यप्राप्तीसाठी व त्याआधारे मोक्षप्राप्तीसाठी आपल्या कुटुंबकबिला आणि दासदासींसह काशीयात्रेला निघालेल्या या बिनकामाच्या मंडळींच्या ओझ्यामुळे आमची पानिपतची मोहीम फत्ते झाली नाही; पण या भाविकांच्या यात्रा-जत्रांचे कारण आमचा इतिहासकार अधोरेखित करून सांगणार नाही. कारण तोही या धर्मविचारांचा प्रतिनिधी असतो. अभिमानीदेखील असतो. त्यामुळेच समग्र, सखोल आणि निर्दोष इतिहासलेखनाला मर्यादा पडतात, यात शंकाच नाही.

याबरोबरच इतिहासाची नोंद करणारा लेखक ज्या वातावरणातून वर आलेला असतो, ज्या वर्ग आणि वर्णातून आलेला असतो, त्याचाही प्रभाव इतिहासलेखनावर होत असतो. एके काळी सारे लेखन आणि नोंदी वरचा वर्ण करीत होता. धर्मग्रंथ आणि अन्य विद्या त्यांनाच अवगत होत्या. इतर कोणत्याही उपेक्षित वर्गाला शिक्षणाची संधीच मिळाली नव्हती. त्यामुळे नकळत अनेक स्वजातीय पुरुषांचा पराक्रम अधिक आत्मीयतेने व अधिक विस्ताराने कथन करावयाचा आणि इतर वर्णातील व्यक्तींच्या पराक्रमाचा ओझरता उल्लेख करावयाचा किंवा त्याला अनुल्लेखानेच मारायचे, अशी वृत्ती नाकारता येत नाही. अगदी 'शिवभारत' या अस्सल मानल्या गेलेल्या ग्रंथातही ही त्रुटी आपणाला जाणवते. ज्याला आपण शूद्र म्हणतो किंवा पूर्वास्पृश्य समजतो, त्या समाजातील अनेकांनी नेत्रदीपक पराक्रम दाखविला आहे. अगदी शिवकाळापासून त्याची उदाहरणे दाखवता येतील. गंगू तेलीण ही ब्राह्मणेतर वर्गातील असल्याने तिने केलेला अतुलनीय पराक्रम आमच्या इतिहासलेखकांना महत्त्वाचा वाटला नाही. जनसामान्यांत मात्र तिच्याविषयी पराकोटीचा आदर होता. शिवछत्रपतींनी सर्व जातिधर्मांच्या रयतेला स्वराज्य-स्थापनेत सहभागी करून घेतले. ज्यांच्या हाती पिढ्यान् पिढ्या नांगराची मूठ होती, त्यांच्या हातात तलवारीची मूठ दिली आणि त्यांनीही देशनिष्ठा, स्वामिनिष्ठा आणि धर्मनिष्ठा यांना प्रमाण मानून लोकोत्तर पराक्रम केला. अनेकांनी जीवनाची आहुतीदेखील दिली. पण आमचा इतिहासकार अशा व्यक्तींच्या समर्पण नि शौर्यावर लिहिताना थोडासा संकोचतो असे वाटते. कारण त्याची सामाजिक प्रतिष्ठा त्यापेक्षा मोठी होती आणि ती कमी व्हावी असे त्याला वाटत नव्हते. शिवछत्रपतींप्रमाणेच नंतरच्या काळात ब्रिटिशांनी पूर्वास्पृश्यांना लष्करी पेशात प्रवेश दिल्याने त्यांचे तेज, पराक्रम आणि बुद्धिमत्ता जगासमोर आली. त्यामुळेच त्रैवर्णिकांच्या कृपेवर आणि त्यांनी दिलेल्या शिळ्यापाक्या अन्नावर जगण्याची पाळी त्यांना आली नाही. या लष्करी पेशामुळे त्यांची आर्थिक परिस्थितीही सुधारली. म्हणूच १७८७ साली कोकणच्या किनारी झालेल्या सागरी युद्धात मदनाक यसनाक या शूद्रवीराने मोठी मर्दुमकी गाजवली. त्यामुळे त्याला जमादार म्हणून बढतीही मिळाली. इ. स. १८१० मध्ये झालेल्या इंग्रज आणि फ्रेंच यांच्या युद्धात धोंडनाक पुलनाक याने शौर्य गाजवले. शिवाय १ जानेवारी १८१८ साली भीमा-कोरेगाव येथे झालेल्या युद्धात महार पलटणीने मोठा पराक्रम गाजविला. त्या वेळी ज्यांनी पराक्रम केला, त्यांची नावे तेथील स्मृतिस्तंभावर कोरलेली आजही आहेत. या साऱ्या गोष्टींची इतिहासात नोंद व्हायला हरकत नव्हती; पण आमचे इतिहासकार ज्या वातावरणातून आले, ज्या सामाजिक स्तरातून आले, त्यांना याची नोंद करावीशी वाटली नाही आणि त्यातूनच आपल्या इतिहासात त्रुटी व अपूर्णता निर्माण झालेली आहे. इतिहासलेखनाची ही एक मर्यादाच म्हणावयास हवी.

म्हणून इतिहासाच्या परिपूर्ण आकलनासाठी










मानव्यविद्या आणि लोकसाहित्य/लोकसंस्कृतीचा अभ्यास अत्यंत आवश्यक आहे. कारण डॉ. रा. चिं. ढेरे यांच्या मते 'लोकसाहित्य आणि लोकसंस्कृती ही सर्व सामाजिक शास्त्रांचे मायपोट आहे.' या साऱ्या मानव्यविद्यांचे संबंध या लोकसंस्कृतीत एकरूप झालेले असतात. अनेक ऐतिहासिक घटना आणि प्रसंगांची मुळे लोकसंस्कृतीत दडलेली असतात. म्हणूनच लोकतत्त्वीय अध्ययनदृष्टीच्या उपयोजनाशिवाय मानव्यविद्येचे अध्ययन अपुरे ठरते. आपणाला ज्या समाजाचा इतिहास सिद्ध करावयाचा असेल, त्या समाजाच्या मनोवस्थेचा, धारणांचा, जीवनदृष्टीचा, श्रद्धा-संकेतांचा धांडोळा 'भ्रांत' मानल्या गेलेल्या लोकपरंपरा आणि लोकसंस्कृतीच्या साधनांची योग्य ती दखल घेतली गेली पाहिजे. इतिहासातील थोर आणि पराक्रमी व्यक्तींच्या नावांचा उलगडा करण्यासाठी-सुद्धा अनेकदा आपणाला लोकसंस्कृतीतील साधनांचा आधार घ्यावा लागतो. एखादे उदाहरण घेऊनच बोलायचे झाले, तर भारताला ललामभूत असणारे आणि अपवादात्मक अशा दुर्मीळ गुणांचा मिलाफ असलेले युगपुरुष श्री शिवछत्रपती यांना जिजाऊ मॉसाहेबांनी दिलेले शिवाजी हे नाव जाणून घेण्यासाठी लोकसंस्कृतीचाच आधार घ्यावा लागतो. शिवाई देवीची माहिती झाल्यावरच हा उलगडा होऊ शकतो. म्हणून लोकसंस्कृतीच्या अभ्यासाची गरज आवश्यक आहे, यात शंका नाही.

म्हणूनच या ज्ञानशाखेचे महत्त्व पाश्चात्त्य इतिहासकारांनी जाणून त्याचा पुरेपूर आधार घेतला. आपल्याकडेही इतिहासाचार्य राजवाडे यांनाही या अशा समग्र इतिहासाचे भान होते. त्यांनी "एका अस्सल पत्रापुढे बखरीचा सारा संभार तुच्छ आहे", असे म्हटलेले असले, तरी त्या काळचा समाज ऐतिहासिक पुरुषाकडे कोणत्या वृत्तीने पाहत होता, याचा ऐतिहासिक कागदपत्रांतून पुरेसा बोध होत नाही; तो बखरींतून होतो असे त्यांना वाटत होते. त्या काळच्या समाजाने शिवप्रभूंना रामाच्या आणि कृष्णाच्या रूपांत अनुभवले होते. अधर्माचे निखंदन, धर्माचे संस्थापन आणि दुष्टांचे निर्दालन या आश्वासनाचा ज्वलंत अनुभव देणारा अवतारी युगपुरुष याच भावनेने त्यांनी शिवप्रभूंच्या चरित्राकडे पाहिले आणि याचेच दर्शन आपणाला बखरीत घडते. एक पौराणिक वीरपुरुष (मिथिकल हीरो) म्हणून त्यांच्याकडे पाहण्याची समाजमनाची अवस्था बखरींतून पाहावयास मिळते. याउलट, इतिहास अगदीच रूक्ष आणि चैतन्यहीन घटनांची नोंद करून मोकळा होतो. परमेश्वराने घेतलेला नवा अवतार ही शिवप्रभूंच्याविषयीची समाजमनाने स्वीकारलेली प्रतिमा इतिहासाला मान्य होत नाही. म्हणून इतिहासकाराने लोकपरंपरेशी जवळीक साधणाऱ्या या साधनांचा विचार केला पाहिजे; तरच समाजाच्या स्थितिगतीचा अंतर्बाह्य इतिहास साकार होऊ शकेल. शिवछत्रपतींच्या मृत्यूचे सभासदबखरीतील वर्णन याचे उत्तम उदाहरण आहे. प्रतापगडचे युद्ध म्हणजे महाराजांच्या स्वराज्याच्या स्वप्नांचा विलक्षण कसोटीचा क्षण! अफजलखानाची भेट म्हणजे महाराजांच्या आणि स्वराज्याच्याही जिवावर बेतलेली भेट होती. अशा या कसोटीत शिवप्रभू यशस्वी झाले. स्वराज्यावरचे संकट टळले, याचा आनंद महाराजांइतकाच त्यांच्या मावळ्यांना झाला. साथीदार-शिलेदारांना झाला. सामान्य रयतेलाही! असा हा विजय साजरा करण्यासाठी महाराजांची मूक संमती घेऊन या शिलेदारांनी पालखीतून तुळजाभवानीची उत्साही मिरवणूक काढली. आनंदाला उधाण आले. महाराजही या विजययात्रेत सहभागी झाले. यातून त्या वेळच्या रयतेचे लोकमानस व्यक्त होते. विजय संपादन केल्यावर महाराजांनी अशी एकदाही मिरवणूक काढली नाही. मात्र रयतेला ती काढावीशी वाटली. ही लोकभावना आपल्या इतिहासात येत नाही. खरेतर तीही यायला हवी. त्यापेक्षाही महत्त्वाची घटना तर पुढेच घडली. ही विजयमिरवणूक चालली असताना बेग नामक इस्लामधर्मीय सेवक जरासा अंतर राखून चालला होता. महाराजांनी त्याला जवळ बोलावून पालखीला खांदा द्यायला लावला. दूर अंतरावर असलेल्या मूर्ती घडविणाऱ्या पाथरवटाला खांदा देण्याचा मान महाराजांनी दिला. ही घटना महाराजांच्या व्यक्तिमत्त्वावर प्रकाश टाकणारी आहे. रयतेविषयी अन् इस्लाम धर्माविषयी असणारी त्यांची व्यापक व अपवादात्मक भूमिका सांगणारी ही घटना आहे. या घटना आपल्या इतिहासात येत नाहीत. त्या तशा आल्या, तरच तो इतिहास समग्र होऊ शकतो. निर्दोष होऊ शकतो. हे काम लोकपरंपरा

आणि लोकसंस्कृतीची साधने पार पाडत असतात. म्हणून त्यांच्या अभ्यासाची गरज आहे.

इतिहासलेखनात कोरीव लेखांचे महत्त्व सर्वाधिक मानले जाते. त्यातील काळाचे उल्लेख सत्यनिष्ठ असतात हे खरे असले, तरी त्यातील आशय ज्या राजपुरुषांच्या विजयाशी /धार्मिक कृत्याशी संबंधित असतो, ते पुरुषही परंपराप्रिय समाजाचे घटक असतात आणि त्या समाजमनाचे पोषकही असतात. त्यामुळेच अनेक राजांनी आपल्या शिलालेखांत स्वतःचा वंश देवाशी/पुराण-पुरुषाशी जोडण्याचा प्रयत्न केलेला आहे. काही कोरीव लेखांत एखाद्या स्थानाच्या माहात्म्याला पोषक पुराणकथा नोंदविलेली असते. काही कोरीव लेखांत आशीर्वादपर अथवा शाप देणारे श्लोक कोरलेले असतात. अनेकदा असे घडते की, सत्यनिष्ठ इतिहास म्हणून त्यांचा स्वीकार इतिहासकार निःसंकोचपणे करतात, किंवा त्या लेखांतील पौराणिकता गांभीर्याने न घेता त्यांची उपेक्षा करतात. पंढरपूरच्या विठ्ठल मंदिरात असलेल्या एका शिलालेखात 'पुंडरिक मुनीमनः कुमुदविकास सुधाकर' म्हणजे "श्री विठ्ठल हा पुंडलिक मुनीच्या मनोरूपी कमळाचा विकास करणारा चंद्र आहे", अशा आशयाची एक ओळ आहे. याचा भावार्थ एवढाच की, ज्या वेळी हा शिलालेख कोरला गेला. त्या वेळी पुंडलिकाची कथा समाजमनाने स्वीकारलेली होती. त्या कथेची प्रतिष्ठा समाजमनात स्थिर झालेली होती. तो काही ऐतिहासिक पुरुष नव्हे. कारण पंढरपूरच्याच शके १२३३ च्या शिलालेखात श्री विठ्ठलाला "दक्षिणद्वारावती, पांढरीपूराधीश्वर, पुंडरिक-वरद, पांडव प्रतिपालक, भक्तजनसेवित" अशी विशेषणे वापरली आहेत. मग पुंडलिकाला जर आपण ऐतिहासिक मानले, तर पांडवप्रतिपालक या विशेषणातील सत्य मानावे काय? मानण्यास तसा पुरावा/आधार नाही. म्हणून कोरीव लेखांतील अभ्यासातही लोकतत्त्वीय दृष्टीचा अवलंब करणे आवश्यक आहे. तीच गोष्ट एखाद्या राजाने स्वतःला लावून घेतलेल्या बिरुदांच्या बाबतीतही सांगता येईल. काही कोरीव लेखांत 'हिरण्यगर्भप्रसूत' हिरण्यगर्भप्रसव असे बिरुद राजाच्या नावाआधी असते. याचा अर्थ 'हिरण्यगर्भातून जन्मलेला' असा असून त्याचे मूळ लोकसंस्कृतीच्या 'हिरण्यगर्भ-महादान' या विधीत आहे. ज्याला द्विजत्वाचा म्हणजेच उपनयनाचा अधिकार नाकारलेला आहे, असा शूद्र परंतु पराक्रमी पुरुष जेव्हा सत्ताधीश बनतो, तेव्हा पुरोहितवर्ग 'हिरण्यगर्भदानां'सारखे विधी घडवून त्याला दिव्य पुनर्जन्माची अवस्था प्राप्त करून देतात. त्यासाठी तीन हात उंचीचे कुंड तयार करतात. त्यालाच सुवर्णाचे गर्भाशय असे संबोधिले जाते. मग या राजाला सुवर्णगर्भामध्ये (कुंडामध्ये) गर्भातील बाळाप्रमाणे आसन घालून बसवतात. नंतर मग पुरोहित हिरण्यगर्भाचे संस्कार करतो. त्यानंतर आतील गर्भरूपी राजपुरुष गर्भाबाहेर येऊन नवा जन्म प्राप्त करतो. बाहेर आल्यावरही नवजात बालकाप्रमाणे पुरोहित त्यांच्यावर संस्कार करतो. हे पार पाडल्यावर राजा म्हणतो, "हे देवश्रेष्ठ हिरण्यगर्भा! मी पूर्वी मातेच्या गर्भातून जन्म घेतला होता. आता या गर्भातून जन्म घेतल्याने मी दिव्यदेही (दिव्यधर्मी )झालो आहे. मला द्विजत्व प्राप्त झाले आहे." याचा भावार्थ असा की, इतिहासकारांनी शूद्र म्हणून उपेक्षणीय मानल्या गेलेल्या उल्लेखाची दखल लोकतत्त्वीय दृष्टीने घेतल्यावरच इतिहास खऱ्या अर्थाने आकलू शकेल, यात शंका नाही.

कोरीव लेखांप्रमाणेच इतिहासप्रसिद्ध घटनेतही लोकपरंपरा आणि लोकसंस्कृतीचा अनुबंध दाखविता येतो. इतिहास आपल्याला शिवछत्रपतींनी दुसरा राज्याभिषेक केला आणि त्यासाठी गागाभट्टाला पौरोहित्य दिलेले नव्हते, एवढाच तपशील देतो. पण यामागे लोकपरंपरा आणि लोकमानस दडलेले आहे, हे इतिहासाला ज्ञात नसते. वैदिक धर्मधारणेनुसार केलेल्या राज्याभिषेका-पेक्षा शाक्तपंथीय धार्मिक धारणेने केलेला राज्याभिषेक रयतेला उचित वाटत होता. शास्त्रपूत वाटत होता. 'आपला' वाटत होता. लोकमानसाची धारणा जाणणाऱ्या राजाने त्यासाठी दुसरा राज्याभिषेक केला आणि त्यामध्येही राजांचे वेगळेपण असे की, शाक्तपंथीय धर्मसंस्कारांत पाच 'म' कारांना जे महत्त्व असते, ते त्यांनी आचरणात आणले नाही; त्यांचा त्याग करूनच हा विधी संपन्न केला. ज्यांच्या बळावर आणि सदिच्छा आणि पराक्रमावर आपणाला राज्यविस्तार करावयाचा आहे, त्या रयतेला नाराज करणे योग्य नाही, त्यांच्या श्रद्धांना छेद देणे उचित नव्हे, त्यांचे मानस उपेक्षिणे योग्य नाही, हे ओळखून

अनुक्रमणिका

राजांनी हा दुसरा राज्याभिषेक केलेला आहे. नाहीतरी शिवप्रभू प्रारंभापासूनच येथे अनेक वर्षांपासून नांदत असलेल्या आणि प्रतिष्ठा/मान्यता पावलेल्या आदिशक्तीचे निष्ठावान उपासक होते. या शक्तीच्या असलेल्या एका रूपाचे – तुळजाभवानी देवीचे – भक्त होते. हा दुसरा राज्याभिषेक केल्यामुळेच इथल्या आम रयतेने त्यांना आपला 'राजा' मानले. त्यासाठी सर्वस्वाचा त्यागही केला. लोकपरंपरा आणि लोकमानस जाणल्याशिवाय या दुसऱ्या राज्याभिषेकाचे मर्म आपणाला समजणार नाही. ऐतिहासिक कागदपत्रे त्यासाठी अपुरी ठरतात. अशाच प्रकारचे दुसरे उदाहरण चाफळ (जि. सातारा) येथील राममंदिराचे सांगता येईल. समर्थ रामदास स्वामींना चाफळच्या नदीकिनारी नव्याने राममंदिर उभे करायचे होते. शेतीवाडी करणारी सारी रयत रामापेक्षा ग्रामदेवतांना पुजणारी. त्या देवतेचे उत्सव करणारी. त्या देवतेलाच आपली श्रद्धा अर्पण करणारी. स्वाभाविकच साऱ्या गावकऱ्यांनी या नव्या राममंदिराला विरोध केला. मंदिरासाठी ते जागाच देईनात. शेवटी मनधरणी करून व तात्पुरती समजूत घातल्यावर गावकऱ्यांनी नदीकिनारी असलेली एक स्मशानभूमीची जागा समर्थांना दाखवली, देण्याची तयारी दाखवली. समर्थ त्या स्मशानभूमीजवळ जाऊन पाहतात तो शेंदराने माखलेल्या लहानमोठ्या दगडांचा खच पडलेला. स्मशानभूमीची जागा त्यांनी स्वच्छ केली. हे सगळे दगडगोटे नदीला अर्पण करीत असतानाच त्यांतील एक शेंदरी दगड समर्थांनी उचलला. आणि जमलेल्या गावकऱ्यांसमोर तो दाखवत "हा आपला म्हसोबा. चाफळचा म्हसोबा. याची मी राममंदिरात नव्याने प्राणप्रतिष्ठा करतो आणि दररोज त्याचा पूजाविधी होऊन त्याला नैवेद्य दाखविण्याची व्यवस्था करतो. मंदिराचा पुजारीच हे सारे करील", असे म्हणून हाती घेतलेल्या त्या शेंदरी म्हसोबाला समर्थ रामदासांनी नमस्कार केला. त्याबरोबर सारे गावकरी चकित झाले. आपल्या ग्रामदेवतेला समर्थांनी रामाबरोबर मंदिरात स्थापिले याचा आनंद त्यांना झाला आणि त्यांचा सारा विरोध मावळला. ते म्हसोबाबरोबरच रामभक्तही झाले. आपला इतिहास चाफळला समर्थांनी राममंदिर उभारले, एवढेच आपणाला सांगतो; पण लोकमानस, लोकश्रद्धा आणि निम्न पातळीवर असलेल्या स्थानिक देवदेवता यांवर असलेली श्रद्धा व धारणा यांचा उलगडा झाल्याशिवाय राममंदिरात म्हसोबा का आणि कसा आला, हे आपणास पूर्णतः समजणार नाही आणि हा उलगडा लोकपरंपरा व लोकमानस यांचे अंतरंग जाणून घेणाऱ्या लोक-संस्कृतीतूनच आपणाला पूर्णतः होऊ शकतो. म्हणून लोकसंस्कृतीचा अनुबंध स्वीकारूनच आपले इतिहास-लेखन व्हायला हवे, असे म्हणावेसे वाटते.

कोरीव लेख, बखरवाङ्मय आणि इतिहासप्रसिद्ध घटना यांच्याप्रमाणेच विशिष्ट स्थळांना महत्त्व का आले, हे समजण्यासाठीही लोकपरंपरेचा आधार घ्यावा लागतो, हेही आपण लक्षात घेतले पाहिजे. प्रतापगडावरील मोहिमेच्या आधी विजापुराहून निघालेला अफजलखान गाणगापूरवर स्वारी न करता, कूडलसंगम गावी असलेल्या वीरशैव तीर्थाला धक्का न लावता, पुढे सोलापूरच्या दैवताकडे लक्ष न देता थेट तुळजापूरकडे येतो व तेथील देवीच्या मंदिरावर आक्रमण करतो, तिथे मंदिराची मोडतोड करतो याचे कारण आपणाला लोकसंस्कृतीत शोधावे लागते. त्याच्या दृष्टीने दत्ताचे भक्ती करणारे त्याचे शत्रू नाहीत. वीरशैव समाजही त्याच्या दृष्टीने गौण आहे. मराठ्यांचे राज्य त्याला जिंकायचे होते. ते जिंकण्यासाठी मराठा सैनिकांचे आत्मबळ त्याला खच्ची करायचे होते. हे आत्मबळ त्यांना तुळजाभवानी पुरवीत होती. कारण ती मराठ्यांची श्रद्धेय देवता होती. या देवतेवरच प्रहार केला की, मराठ्यांना लढण्यासाठी आवश्यक असणारे मनगटाचे बळ खच्ची होणार होते. म्हणून तो तुळजापुरावर चालून गेला. मराठा व महाराष्ट्र समाजाच्या मनी-मानसी ही देवी नांदते, याचा उलगडा आपली लोकसंस्कृती करते. तिचा संदर्भ घेतल्याशिवाय तुळजापुरावर केलेली मोहीम आपणाला पुरती समजणार नाही. पंढरपूरच्या विठ्ठल मंदिरावर होणारी आक्रमणेदेखील याच प्रकारची आहेत. विशिष्ट स्थळाला आलेले महत्त्व लोकसंस्कृतीच्या आधारे उलगडून दाखविणारे आणखी एक उदाहरण म्हणजे दौलताबाद या शहराचे सांगता येईल. औरंगजेब बादशहाची कबर याच ठिकाणी का झाली, हे खरोखर पाहण्यासारखे आहे. दौलताबादचे मूळ नाव रोझा हे आहे. नंतर त्याला दौलताबाद हे नाव

मिळाले. तर या रोझाला तीर्थक्षेत्राचे रूप प्राप्त झाले होते. त्याला भारतातली 'दुसरी मक्काच' मानले जायचे. कारण अनेक मुस्लिम साधू-संतांच्या कबरी याच गावी अस्तित्वात आहेत. नासिरजंग, मलिक अंबर, निजामशहा, तानाशहा ही काही त्यांतील ठळक नावे. तसेच इ. स. १३०० मध्ये उत्तर भारतातून जर्जरीबक्ष हा साधू सातशे फकिरांना आपल्या बरोबर घेऊन रोझा या गावी आला. आता एकाच वेळी आणि एकाच गावी सातशे फकीर येतात म्हणजे या रोझाची ख्याती किती म्हणावी? शिवाय शेकडो मुसलमान धर्मप्रचारासाठी तेथेच स्थायिक झाले. त्यामुळेच "मुस्लिमांच्या अध्यात्म फौजेने दक्षिणेत केलेली चढाई" असा उल्लेख एका मुस्लिम ग्रंथात केलेला आढळतो. म्हणून मुस्लिम धर्माचा आयुष्यभर आचार नि प्रचार करणाऱ्या औरंगजेबाला आपली कबर याच ठिकाणी असावी, असे वाटले, आपला इतिहास याची फक्त कोरडी नोंद करून मोकळा होतो. पण लोकतत्त्वीय साधनांच्या आधारे याकडे पाहिले की, त्यातील मर्म लक्षात येते. दौलताबादलाच त्यांची पसंती का होती, हे आपणाला पूर्णपणे कळून येते.

लोकमानस आणि लोकसंस्कृती यांचा आधार घेतल्याशिवाय प्रतीकांचा अर्थही परिपूर्ण स्वरूपात आपल्या हाती लागत नाही. अनेक राजे आपल्या ध्वजावर नाग, हत्ती किंवा वाघ यांची प्रतीके तयार करतात. लोकमानसाने या प्रत्येक प्रतीकाला एक अर्थ बहाल केलेला आहे. सर्जनाचे, चापल्याचे प्रतीक म्हणून नागाकडे पाहिले जाते. सामर्थ्याचे प्रतीक म्हणूनही त्याकडे पाहिले जाते; कारण त्याच्या दंशाने कोणत्याही माणसाचे क्षणार्धात होत्याचे नव्हते होते. त्याला मृत्यूला सामोरे जावे लागते. या तीन गोष्टींचे प्रतीक म्हणून ध्वजावर नाग कोरला जातो. तीच गोष्ट हत्तीची. त्याकडेही सामर्थ्य, बुद्धिमत्ता आणि वैभवाचे प्रतीक म्हणून पाहिले जाते. वाघाच्या प्रतीकामागचा अर्थ आपणा सर्वांना ज्ञात आहेच. अनेक पराक्रमी पुरुष भक्ती, पुण्यप्राप्ती अथवा विजयाचे प्रतीक म्हणून एखाद्या श्रद्धेय देवतेचे मंदिर उभे करतात. त्या मंदिराच्या प्रवेशद्वाराजवळ अथवा गाभाऱ्यात कासवाची दगडी प्रतिमा कोरलेली असते. देवळाच्या गाभाऱ्यात हे कासवच का कोरतात, याचा उलगडा आपली संस्कृती करते. पुराणकथेत असलेल्या दशावतारांत हा एक अवतार आहेच. पण दीर्घायुष्य आणि इंद्रियदमन याचे प्रतीक म्हणून ते गाभाऱ्यात असते. त्याला पाहताच आपणास या दोन गोष्टींचे स्मरण व्हावे ही यामागची धारणा आहे. शिवप्रभूंच्या गळ्यात कवड्यांची माळ असायची, एवढेच आपणाला इतिहास सांगतो. लोकसंस्कृती त्यातील मर्म स्पष्ट करते. आपण तुळजाभवानीचे परमभक्त आहोत, याचे प्रतीक म्हणून ती त्यांनी धारण केलेली आहेच; पण ही कवडी निर्मितीचे प्रतीक आहे. जननेंद्रियाचे प्रतीक आहे. आर्यांच्या आगमनापूर्वी इथे आदिशक्तीची उपासना रूढ होती. त्या उपासनेचे प्रतीक म्हणून पूर्व भारतात कामाक्षी देवीची उपासना आजही रूढ आहे. आपल्याकडेही ललितागौरीची जी उपासना केली जाते, त्यामागे हीच धारणा आहे. या उपासनेचे प्रतीक म्हणून महाराजांच्या गळ्यात कवड्यांची माळ विराजमान झालेली आहे. पेशवा सवाई माधवरावांच्या शाही विवाहानंतर त्यांची वरात ज्या रस्त्यावरून निघालेली होती, त्या रस्त्यावर कमरेवर पाण्याचा घट घेतलेल्या अनेक सौभाग्यवतींना नाना फडणविसाने उभे केले होते. एखाद्या चांगल्या गोष्टीसाठी आपण प्रस्थान ठेवले असताना रस्त्यात जर पाणी घेतलेल्या विवाहिता आडव्या आल्या, तर ते शुभकारक मानतात, हे आपली संस्कृती सांगते. अशा शुभशकुनासाठी त्यांना उभे केलेले होते. हा उल्लेख आपल्या 'पेशव्यांची बखर' यात आलेला आहे. एखाद्या मोहिमेचा प्रारंभ करताना पाहिले जाणारे मुहूर्त आणि शुभशकुन यांमागेही लोकश्रद्धाच उभी असते. पानिपतचा आपला पराभव अब्दालीने जितका केला, तितकाच शुभशकुनात अडकल्याने चढाईत केलेल्या विलंबाने केलेला आहे. लोकश्रद्धा आणि लोकधारणा अनेकदा इतिहासाला आमूलाग्र कलाटणी देऊ शकते, याचे उदाहरण म्हणजे आपले पानिपतचे युद्ध म्हणावे लागेल.

आपल्याकडे परंपरेने चालत आलेली जी लोकगीते आहेत, त्यांतूनही आपल्या इतिहासावर प्रकाश टाकता येतो. (१) 'आंबा पिकतो रस गळतो। कोकणचा राजा झिम्मा खेळतो' या गीतातून राजाच्या साक्षीने आणि राजाच्या समवेत प्रथम आलेले आम्रफल अवघी जनता उत्सवाने खाण्याची रूढ असलेली प्रथा व्यक्त होते,





असे श्री. व्यं. केतकरांनी दाखवून दिलेले आहे. तर (२) "अंगाई, मंगाई ये ग तू गाई" या ओळीतून धनगरांच्या कथागीतात आढळणारी आणि आपल्या सुनेला निर्दयपणे छळणारी मंगाई व्यक्त झालेली आहे. कथागीतातील मंगाई समजल्यावरच हे लोकगीत समजू शकेल. म्हणजे लोकगीतातूनही अनेकदा प्रकाश टाकला जातो, हे सत्य आहे. (३) "कुकूच्या कू राजाची लेक माझी बायकू" या सर्वांना परिचित असलेल्या लोकगीताच्या पाठीमागे एक आख्यायिका उभी आहे. ती अशी : ठाणे जिल्ह्यातील सूर्या नदीच्या काठावर असलेल्या महालक्ष्मीबरोबर आपण लग्न करावे, असे भीमाला वाटले. पण या महालक्ष्मीने त्याला अट घातली की, 'तू एका रात्रीत या सूर्या नदीवर बांध घालावा.' भीमाने हे आव्हान स्वीकारले आणि तो कामाला लागला. बांध आता पुरा होतो आहे याची जाणीव होताच महालक्ष्मीला धास्ती पडली. त्यासाठी कोंबड्याचे रूप घेऊन ती आरवली. त्या आवाजामुळे भीमाला वाटले, पहाट झाली. त्याने काम अपुरे टाकले नि निघून गेला. भीमाच्या फसवणुकीचे केलेले विडंबन या ओळीत आहे. याच आशयाची कथा गुजराथ आणि बिहार राज्यांतही प्रचलित आहे.

वरील साऱ्या बाबींचा विचार करता इतिहास आणि लोकपरंपरा/लोकसंस्कृती यांच्यामध्ये एक सशक्त असे आंतरिक नाते आहे, यात शंका नाही. या दोहोंच्या परस्पर अनुबंधाकडे आपण दुर्लक्ष करून चालणार नाही. उलट, १) इतिहासाच्या पोटात असलेले लोक-मानसाचे स्पंदन जाणून घेण्यासाठी, २) इतिहासाच्या मोकळ्या जागेत लपलेला इतिहास समजण्यासाठी, ३) इतिहासाच्या शब्दात न मावणारा श्रद्धाभाव त्या शब्दात आणण्यासाठी, ४) सत्यदर्शनाबरोबरच भावदर्शन, मूल्यदर्शन आणि जीवनदर्शन यांच्या साक्षात्कारासाठी, ५) समाजाच्या मानसिक भरण-पोषणाचे मर्म समजण्या-साठी, आणि ६) त्या काळाचा युगधर्म पारखण्यासाठी लोकपरंपरा आणि लोकसंस्कृतीचा अनुबंध तितकाच आवश्यक आहे. सत्याच्या संपूर्ण साक्षात्कारासाठी सत्याच्या पुढे दिवा असून चालत नाही, सत्याच्या पाठीमागेही दुसरा दिवा आवश्यक असतो. लोकसंस्कृती या दुसऱ्या दिव्याची भूमिका बजावते!

**संदर्भ**

अखिल महाराष्ट्र इतिहास परिषदेच्या नांदेड येथे झालेल्या (ता. २९ नोव्हेंबर) २२ व्या अधिवेशनात अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणाचा आधार या लेखाला आहे.







# धर्मनिरपेक्षता, धर्मस्वातंत्र्य आणि न्यायालयाचे निकाल

दत्ताहरी रामराव होनराव

**प्रस्तावना :**

धर्मनिरपेक्षता हा आजच्या भारतीय राजकारणातील महत्पदास पोचलेला बहुचर्चित विषय आहे. भारतीय राजकारणात खऱ्या अर्थाने 'धर्मनिरपेक्षता' हाच अत्यंत महत्त्वाचा व ऐरणीवर असलेला बहुचर्चित विषय आहे. कारण भारतातील राजकीय पक्षांचे स्थूलमानाने या तत्त्वावरच ध्रुवीकरण होताना दिसते. बाकी सर्व विषय, धोरणे, पक्षाची कार्यपद्धती कमीअधिक प्रमाणात सारखी आहे. अलीकडच्या काळात होत असलेल्या पक्षीय आघाड्या ह्यादेखील धर्मनिरपेक्ष पक्षांमध्ये होत आहेत. निवडणुकांमध्ये धर्मनिरपेक्षतेचा मुद्दा नेहमीच महत्त्वाच्या स्थानावर असतो. राज्यधटनेनुसार एखाद्या राजकीय पक्षाचे निवडणूकप्रचारातील वर्तन धर्मनिरपेक्षतेच्या विरोधी असेल, तर त्या पक्षाची मान्यता रद्द होते. यासाठीच स्वतंत्र निर्वाचन आयोग आहे. तो राजकीय पक्षांचे निवडणुकीतील वर्तन नियंत्रित करतो. केशवानंद भारती (१९७३) खटल्यात सर्वोच्च न्यायालयाने धर्मनिरपेक्षतेचे तत्त्व हे भारतीय राज्यघटनेची मूलभूत चौकट आहे, असे म्हटले आहे. त्यामुळे घटनेतील ३६८व्या कलमानुसार ही मूलभूत चौकट बदलण्याचा अधिकार संसदेलादेखील नाही. १९९६ मध्ये निवडणुकीनंतर सर्वांत अधिक लोकसभासदस्य असलेला पक्ष सत्तेवर येऊ शकला नाही. दुसऱ्या क्रमांकाचा पक्षही सरकार बनवण्याच्या वाटेला गेला नाही. त्यानंतरच्या तेरा-चौदा क्रमांकाचे पक्ष एकत्र येऊन सरकार बनवितात. हे सरकार केव्हा पाडायचे नि मग मनासारखे झाल्यावर केव्हा उभे करायचे, हे त्याला बाहेरून पाठिंबा देणारा वरील दुसऱ्या क्रमांकाचा पक्ष ठरवीत असतो. ही सारी किमया धर्मनिरपेक्षतेची आहे. काही वर्षांपूर्वीपर्यंत काहीजण आम्ही धर्मनिरपेक्ष नाही, असे अभिमानाने म्हणत. 'धर्मनिरपेक्षता' ही परकीय संकल्पना भारतात लागू होत नाही, असे आग्रहाने सांगत. आता मात्र प्रत्येकजण स्वतःला 'खरा' धर्मनिरपेक्ष व दुसऱ्याला 'नकली' धर्मनिरपेक्ष मानून टीका करू लागला आहे.[१] प्रत्येकजण उठतो नि 'धर्मनिरपेक्षते'ची स्वतःची व्याख्या करतो. व्याख्यांच्या गोंधळात या राष्ट्राचा जीव गुदमरून कासावीस होऊ लागला आहे. सर्वांना आता सांगण्याची वेळ आली आहे की, "हे देशभक्तांनो, तुमच्या या मनाच्या व्याख्या बंद करा. भारतीय राज्यघटनेने 'धर्मनिरपेक्षते'चा कोणता अर्थ दिला आहे, तो लक्षात घेऊन मान्य करा." परंतु कोणताही राजकीय पक्ष, कोणताही विचारवंत हे लक्षात घ्यायला तयार नाही. पण भारतीय राज्यघटनेतील धर्मनिरपेक्षतेचा अर्थ समजून घेणे, अत्यंत महत्त्वाचे व आवश्यक आहे.

**धर्मनिरपेक्षतेचा विषय**

नरहर कुरुंदकरांच्या मते, 'धर्माशी संबंधित असणाऱ्या अगर नसणाऱ्या इहलौकिक जीवनातील प्रश्नांबाबत कायदा करणे सरकारचा हक्क आहे. पुन्हा इहलौकिक बाब कशाला म्हणावे, हे तर संसदच ठरवणार.'[२] 'राज्याचे धर्माविषयी धोरण' कोणते असावे, हा धर्मनिरपेक्षतेचा विषय आहे. अर्थात भारतीय राजकारणात प्रत्येकजण या संबंधात स्वतःची भूमिका ठरवीत असतो व तीच धर्मनिरपेक्षता आहे, असे ठरवून स्वतःला धर्मनिरपेक्ष मानीत असतो. त्यामुळेच धर्मनिरपेक्ष नाही, असा या देशात कुणीही सापडत नाही. हाच या संबंधातील खरा गोंधळ आहे. कारण यातील मूलभूत गोंधळ हा धर्माची व्याख्या कोणती घ्यावी, यातून जन्मलेला आहे. प्रत्येकाने आपणच धर्माचा अर्थ ठरवायचा आणि आचरण करायचे, असा हा सावळा गोंधळ चालू आहे. घटनेने नागरिकांना धर्मस्वातंत्र्याचा हक्क दिलेला आहे, याचा अर्थ आम्ही सर्वांनी असा घेतलेला आहे की, घटनेने प्रत्येक नागरिकाला किंवा प्रत्येक धर्माला 'धर्म' म्हणजे काय, हेही ठरविण्याचा हक्क दिलेला आहे. म्हणजे पहिल्यांदा 'धर्म' म्हणजे काय हे ठरविण्याचा हक्क नि नंतर त्यानुसार आपल्याला जो 'धर्म' वाटेल

तो मानण्याचा हक्क या समजातून भारतात धर्मनिरपेक्षतेचा गोंधळ निर्माण झालेला आहे. याला उत्तर हे आहे, की 'धर्मस्वातंत्र्य राज्यघटनेने दिलेले आहे तेव्हा याचा अर्थ घटनाच ठरवते.' कुरुंदकरांच्या भाषेत सांगावयाचे झाल्यास, 'धर्मस्वातंत्र्य संविधानात आहे, संविधानाचा अर्थ संविधानाचे शब्द, संविधानसभेतील चर्चा, संविधानाचा संदर्भ या बाबी विचारात घेऊन सुप्रीम कोर्ट लावीत असते. गरज पडल्यास लोकसभा संविधानदुरुस्तीने संविधानाला नवा अर्थ प्राप्त करून देत असते. प्रत्येक पंडिताने आपल्या सोयीनुसार अर्थ करावयाला संविधान हे काही धर्मशास्त्राचे पुस्तक नाही.'[३] अर्नेस्ट बार्कर यांच्या मतानुसार, 'प्रत्येक व्यक्ती आणि संघटना यांना आपल्या कार्यक्षेत्रात निर्णय घेण्याचा हक्क असतो. त्यानुसार ते निर्णय घेऊन त्याची अंमलबजावणीही करीत असतात. त्यांचे पालन न करणाऱ्यास दंडित करण्याचाही त्यांना अधिकार असतो. परंतु त्यांचे हे अधिकार मर्यादित असतात. त्यांच्या या स्वायत्ततेचा उपद्रव इतरांना होऊ नये, याची त्यांनी काळजी घ्यावी लागते. तसेच त्यातून समाजधारणेला बाधा पोचणार नाही, याच्याही मर्यादा त्यांना पाळाव्या लागतात. म्हणून अशा वेळी सर्वसमावेशक संघटनांचे या सर्वांवर नियंत्रण असावे लागते व ही जबाबदारी राज्यावर असते. म्हणून राज्याच्या विधिमय सार्वभौमत्वाची संकल्पना निर्माण झाली. समाजात असा एकही प्रश्न नसतो की, ज्यासंबंधी निर्णय घेण्याचा अधिकार राज्याला पोचत नाही.'[४] म्हणून विधिमय सार्वभौम प्रश्नावर अंतिम निर्णायक भूमिका केवळ राज्यच घेऊ शकते. हेरॉल्ड लासवेलने याच कारणास्तव समाजातील मूल्यांची अधिकृत निर्धारणा आणि अंमलबजावणी करणे हे राज्य या संघटनेचे व्यवच्छेदक लक्षण मानले आहे.[५] त्यामुळे धर्म आणि धर्मनिरपेक्षतेची व्याख्या करण्याचे काम प्रत्येकाचे नसून राज्याचे आहे.

सामान्यतः घटनेनुसार ज्यांना कायदे अथवा नियम करण्याचा अधिकार मिळतो, त्या सर्व संस्था-संघटना म्हणजे 'राज्य'/शासन होत. या ठिकाणी 'शासन' या शब्दात केंद्रसरकार, राज्यसरकार, लोकसभा, विधानसभा, न्यायालये व कायद्यान्वये स्थापित झालेल्या इतर संस्था, मंडळे, प्राधिकरणे, विद्यापीठे, परिषदा, आयोग इत्यादींचा समावेश होतो. एखाद्या विद्यापीठास कायदे, नियम करण्याचा अधिकार आहे, म्हणून एखाद्या विशिष्ट धर्मास प्रवेश नाही असा नियम करता येणार नाही. 'अलिगड मुस्लिम विद्यापीठ' असले तरी ते बिगरमुस्लिमांना प्रवेश नाही असा नियम करू शकत नाही. 'अलिगड विद्यापीठ भारत सरकारचे विद्यापीठ आहे, हाच संविधानाचा निर्णय येणार.'[६] एखादी नोंदणीकृत संघटनासुद्धा विशिष्ट धर्माला प्रवेश नाकारणारा नियम करू शकत नाही. कारण राज्याचे धर्माविषयीचे धोरण निश्चित झालेले आहे. ते राज्यघटनेने निश्चित केले आहे. ते धर्मनिरपेक्षतेचे धोरण आहे. अशा प्रकारे धर्माचे क्षेत्र ही राज्याच्या अधिकार-क्षेत्रातील बाब आहे हे खरे असले, तरी धर्माचा पारलौकिकतेशी व ईश्वराशी संबंध असल्यामुळे ऐतिहासिक काळात धर्म ही बाब मानवी जीवनात सर्वव्यापी बनली होती. तिचा संबंध मानवी जीवनाच्या मूलभूत उद्दिष्टांशी जोडण्यात आला होता. 'मोक्ष' हे मानवी जीवनाचे सर्वोच्च उद्दिष्ट मानले जात होते व मोक्षप्राप्ती करून देणे हे धर्माचे काम आहे, असे प्रस्थापित झाल्यामुळे धर्माला मनुष्याच्या जीवनात अत्यंत महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले होते. धर्मांचा संबंध आत्म्याशी व राज्याचा संबंध शरीराशी असतो. आणि आत्मा चिरंतन असून शरीर नश्वर आहे. त्यामुळे शरीरापेक्षा आत्मा श्रेष्ठ व त्या न्यायाने राज्यापेक्षा धर्म श्रेष्ठ ही कल्पना रुजून राज्य ही केवळ धर्माच्या आदेशानुसार काम करणारी संघटना आहे. त्यामुळे सर्व व्यवहार धर्माच्याच आदेशानुसार चालविण्याचा एक काळ मानवी इतिहासाने पाहिला आहे. परंतु यातून धर्माची बहुलता असलेल्या समाजात धार्मिक संघर्षमय परिस्थिती उद्भवते. शिवाय धर्म ही अध्यात्म व गूढतेवर आधारलेली बाब असल्यामूळे धार्मिक अभिजन या सक्तीचा दुरुपयोग करून सामान्यजनांचे शोषण करण्याची दाट शक्यता असते. इतिहासात झालेही तसेच. यातूनच धर्मयुद्धे झाली. सामान्य माणसाचे शोषण होऊ लागले. माणसाचे ऐहिक जीवन यातनामय झाले आणि यातून विद्रोह पेटला. यातून दोन समांतर सत्तांच्या तत्त्वांचा उदय झाला. राज्याच्या सार्वभौमत्वाला मान्यता मिळाली. म्हणून आता धर्माचे क्षेत्र पारलौकिक आणि राज्याचे क्षेत्र इहलौकिक अशी

अनुक्रमणिका

विभागणी झाली. त्यामुळे आता राज्याला आपले धार्मिक धोरण ठरविण्याची मोकळीक असली, तरी आता सर्वत्र व्यामिश्र समाजव्यवस्था असल्यामुळे धार्मिक पक्षपात करणारे धोरण राज्याला आखता येत नाही. सामूहिक पुरुषार्थातून सामूहिक विकास साधण्याचे धोरण आखणे राज्याला आवश्यक आहे. त्याशिवाय लोकांचे मूलभूत भौतिक प्रश्न सुटत नाहीत. ते सुटले नाहीत, तर राज्याच्या अधिमान्यतेची क्षती होते. धर्म ही एका मर्यादित समूहाला जोडणारी जशी बाब आहे, तशी ती त्या समूहाला इतरांपासून तोडणारीही बाब आहे. धार्मिक वर्चस्वाची स्पर्धा सुरू झाल्यास राज्याच्या मूळ उद्दिष्टालाच बाधा पोचते व त्याची अंतिम परिणती राष्ट्रीयत्वाची, विकासाची आणि अधिमान्यतेची क्षती होण्यात होते. म्हणून धर्म आणि धर्मनिरपेक्षतेच्या प्रश्नात राज्याला बघ्याची भूमिका न घेता सामूहिक ऐक्यातून विकासाकडे जाणाऱ्या भूमिकेला पोषक धोरण ठेवणे क्रमप्राप्त आहे.

'अहिंसा परमोधर्मः'[७] 'धर्म म्हणजे रिलिजन नव्हे'[८] 'धारणात धर्म इत्याहुः।'[९] 'समाजाचे धारण करतो तो धर्म.' धर्माचे मुख्य स्वरूप समाजधारणेचे म्हणजे ऐहिक स्वरूपाचे आहे, अशी धर्माची व्याख्या सांगितली जाते. राजकारण, समाजकारण, अर्थकारण, नीतिमूल्ये, वैयक्तिक जीवन, पारलौकिक सुख इ. सर्वच गोष्टी धर्माने ठरविलेल्या होत्या. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे सारे धर्माचेच भाग होते. मानवी जीवनातील कोणतीही गोष्ट धर्माच्या अधिकाराबाहेर नव्हती. म्हणूनच धर्माला 'जीवनाचा मार्ग' (Way of Life) म्हटले जाई. आजही याच अर्थाने हिंदू लोक आपल्या धर्माला 'जीवनाचा मार्ग' म्हणतात. जीवनातल्या प्रत्येक गोष्टीसाठी धर्मात मार्गदर्शन आहे, असे हिंदूही मानतात. ज्याने 'अभ्युदय व निःश्रेयस साधतो तो धर्म', अशीही धर्माची एक व्याख्या आहे. यातील 'अभ्युदय म्हणजे इहलोकीचे कल्याण व निःश्रेयस म्हणजे परलोकीचे कल्याण होय.'

असा हा उभय लोकींचे कल्याण करणारा व सर्व जीवनाचे मार्गदर्शन असणारा पारंपरिक धर्म कोठेही सापडत नाही. सापडला तर तो सर्व जीवनाचे मार्गदर्शन करणारा आहे हे कोण ठरवणार, हा प्रश्न आहे. या धर्माने कल्याण होत आहे, हे कोणी ठरवायचे, व ते कल्याण कोणत्या आधारे ठरवायचे असा दुसरा प्रश्न आहे. कल्याण होत नसेल तर तो धर्म बदलायचा की नाही व तो कुणी बदलायचा, असे अनेक प्रश्न आहेत. या सर्व प्रश्नांचे धर्मप्रणीत उत्तर असे की, सारे धर्मशास्त्रात आधीच सांगून ठेवलेले आहे. त्यातील आदेशानुसार वागले की, सर्व कल्याण होऊन जाते. यासाठी धर्मशास्त्रात बदल करण्याची गरज नाही. त्यातील शिकवण सोडून देण्याची गरज नाही, तर ते धर्मशास्त्र प्रमाण मानून फक्त त्यातील श्लोकांचा योग्य अर्थ काढणे एवढेच आपल्या हातात आहे. हिंदूंचा धर्म घेतला तरी त्या धर्मात जी अनुमती दिलेली आहे, ती शास्त्रार्थ काढण्याची आहे. प्रत्येक गोष्टीला शास्त्राधार हवाच; फक्त वेगळा शास्त्रार्थ काढण्याची मोकळीक, असा हा प्रकार आहे. 'श्रुतिस्मृतिपुराणोक्त' हा शब्द यासाठी वापरात आलेला आहे. म्हणजे वर जो धर्म अभिप्रेत आहे, तो शास्त्राधारावर आधारलेला धर्म आहे.[१०] येथे सर्व मानवी जीवन धर्मग्रंथांच्या आदेशांनी नियंत्रित करण्यात आलेले आहे.

हजारो वर्षांपासून 'धर्म' हा शब्द अतिशय व्यापक व विविध अर्थांनी रूढ झालेला आहे. धर्म हा सुटा शब्द अर्थबोधहीन आहे. आता आपले काम हे आहे की, कोणत्या क्षेत्रात वा संदर्भात 'धर्म' शब्दाचा कोणता अर्थ घ्यावा, हे निश्चित करून घेणे. उदा., 'नियम' हा शब्द घेतला तर त्याचा अर्थ त्या नियमाचे क्षेत्र, विषय वा संदर्भ लक्षात घेतल्याशिवाय कळणारच नाही. निसर्गाचे नियम, परीक्षेचे नियम, रहदारीचे नियम, शुद्धलेखनाचे नियम असे शब्दप्रयोग आपण वापरत असतो. अर्थात येथे केवळ 'नियम' या शब्दाने काहीही निश्चित लक्षात येत नाही. त्यासाठी नियमाच्या पाठीमागे कोणतेतरी क्षेत्रसूचक वा विषयसूचक विशेषण असणे आवश्यक असते. हा नियम धर्माच्या बाबतीतही लागू पडतो. म्हणजे केवळ 'धर्म' या शब्दाने काहीही निश्चित कळत नाही, कोणतेही विशिष्ट ज्ञान होत नाही. त्यासाठी 'धर्मा'च्या पाठीमागे कोणतेतरी विषयसूचक विशेषण असणे आवश्यक असते. उदा., पतिधर्म, पुत्रधर्म, शेजारधर्म, हिंदुधर्म, ख्रिश्चनधर्म इत्यादी. 'धर्म' म्हणजे काहीतरी कळल्याचा भास होणारा, प्रत्यक्षात हातात काहीही न पडणारा, निव्वळ मोघम व गोलमाल शब्द आहे. केवळ

हा शब्द वापरून कित्येकजण आपण निश्चित काहीतरी मांडले आहे, असा आभास निर्माण करीत असतात. 'धर्म' संकल्पनेचा मूलभूत गोंधळ अशा प्रकारे मोघमपणातून निर्माण होतो.

**धर्म आणि भारतीय राज्यघटना**

यातून निर्माण होणारा पहिला प्रश्न हा की, प्रत्येकाने जर आपापला धर्म हा जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात प्रमाणभूत व परिपूर्ण जीवनमार्ग म्हणून स्वीकारायचा ठरविला, तर भारतीय राज्यघटनेला कोणते अधिकारक्षेत्रच शिल्लक उरणार नाही. आज राज्यघटनेला जे स्थान व जे अधिकार आहेत. ते धर्माला दिल्यासारखे होणार आहे. यामुळे या देशावर राज्यघटनेचे नाही तर धर्मग्रंथांचे राज्य सुरू होईल. भारतीय राज्यघटनेपेक्षा आमचा धर्म श्रेष्ठ आहे, असे सांगण्याचा हा प्रकार आहे. इस्लामप्रमाणे अल्लाह हाच एकमेव सार्वभौम आहे. अल्लाशिवाय अन्य कोणीही सार्वभौम असूच शकत नाही. अल्लाशिवाय इतरांना सार्वभौम मानणे हा अनेकेश्वरवाद आहे. त्यामुळे तो इस्लामला मान्य नाही. जनतेला, संसदेला किंवा राज्यघटनेला सार्वभौम मानणे हा एक प्रकारचा अनेकेश्वरवाद आहे, अशी भूमिका घेता येऊ शकते, घेतली जाते. अल्लाचे कायदे व मानवी संसदेने केलेले कायदे यांत विरोध आला तर, यांपैकी कोणते श्रेष्ठ मानायचे हा महत्त्वाचा प्रश्न यातून निर्माण होऊ शकतो. त्यामुळे मुसलमान हे तत्त्वतः राज्यघटनेला सार्वभौम मानू शकत नाहीत, हे सहज लक्षात येते. पण आमचा धर्म हा संपूर्ण जीवनमार्ग आहे, असे जेव्हा हिंदू म्हणतात, तेव्हा त्याचा अर्थ अप्रत्यक्षपणे तेही राज्यघटनेला सार्वभौम मानण्यास नकार देतात असा होतो, हे आपल्या लवकर लक्षातच येत नाही. तेव्हा आमचा धर्म हा सर्व जीवनाला व्यापणारा संपूर्ण जीवनमार्ग आहे, प्रमाण आहे, तो केवळ संप्रदाय नाही, ही भूमिका राष्ट्राच्या, समाजाच्या व राज्यघटनेच्या दृष्टींनी कशी संकटात टाकणारी आहे, हे हिंदूंच्याही नीट लक्षात आलेले नाही.

यातून निर्माण होणारा दुसरा प्रश्न म्हणजे प्रत्येकाला आपापल्या धर्मातील आदेशाप्रमाणे जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात वागण्याचे स्वातंत्र्य दिल्यास भारतासारख्या बहुधर्मीय देशात एक प्रकारे धर्मसंघर्षाला मुक्त परवाना दिल्यासारखे होईल. आपापल्या धर्माप्रमाणे प्रत्येकजण वागू लागला तर काय अवस्था निर्माण होईल, याची कल्पना कोणालाही करता येईल; मात्र याची नीट कल्पना येण्यासाठी सर्व धर्मांचे ज्ञान असणे आवश्यक आहे. ज्याला सर्व धर्मांचे ज्ञान नाही, तो या बाबतीत काय कल्पना करू शकणार? अशी गंभीर अवस्था निर्माण होऊ नये म्हणून विशेषतः बहुधर्मीय देशांत धर्मातील कोणता भाग पाळायचा नि कोणता पाळायचा नाही, या संबंधात घटनात्मक व कायदेशीर नियंत्रणे घातली जातात. काही हिंदू मंडळींनी अशी भूमिका मांडली आहे की, हिंदुधर्म हाच एकमेव धर्म असून बाकीचे केवळ पंथ (वा संप्रदाय वा उपासना-पद्धती) आहेत. ही भूमिका चुकीची आहे. या भूमिकेचा अर्थ असा होतो की, इस्लाम हा 'जीवनमार्ग' या अर्थाने धर्म नसून केवळ अल्लाची उपासना करणारा 'संप्रदाय' आहे. म्हणजे इस्लाममध्ये मानवी जीवनाच्या इहलौकिक बाबीविषयी कोणतेही मार्गदर्शन नसून तो धर्म फक्त नमाज कसा पढावा, रोजा कसा करावा, ईद कशी साजरी करावी, हजला जाऊन तेथे काय करावे इ. धार्मिक विधींसंबंधी मार्गदर्शन करणारा आहे. त्यामुळे कुरुंदकरांना हिंदूंचे हे अज्ञान दूर करणे महत्त्वाचे वाटते. इस्लाम हाही हिंदूप्रमाणेच सर्व जीवनाचे मार्गदर्शन करणारा धर्म आहे, जीवनमार्ग आहे ही वस्तुस्थिती आहे.

मुसलमानांना प्रामाणिकपणे असे वाटत असते की, इस्लाम हा संपूर्ण जीवनाचे मार्गदर्शन करणारा धर्म आहे. काही हिंदूंचे प्रामाणिक मत असू शकते की, 'वाटणे' नि 'असणे' यांत फरक आहे. आता या संबंधात निर्णय कोणी घ्यायचा? माझा धर्म सत्य व दुसऱ्याचा खोटा व अपूर्ण म्हणण्याचा हा प्रकार आहे. या संबंधातील तिसरा प्रश्न म्हणजे, राज्यघटनेत सेक्युलॅरिझम किंवा धर्मस्वातंत्र्याचा दिलेला मर्यादित हक्क हा आहे. आमचा धर्म हा सर्व जीवनाचे मार्गदर्शन करणारा आहे, असे आपण कितीही अभिमानाने व आग्रहाने म्हणत असलो, तरी प्रत्यक्षात आपल्याला धर्मस्वातंत्र्य किती असावे, हे राज्यघटनेने निश्चित करून दिलेले आहे. एवढेच नव्हे तर 'धर्म' म्हणजे काय, हेही घटनेने स्पष्टपणे सांगितलेले आहे. दुर्दैवाची गोष्ट अशी की, भारतीय मुसलमानच

नव्हे, तर हिंदूंनाही राज्यघटनेतील धर्मस्वातंत्र्याची भूमिका अद्याप पटायची आहे. त्यांनीच ती स्पष्टपणे अद्याप मान्य केलेली नाही.

आपल्या घटनेत धर्मस्वातंत्र्याची तरतूद कलम २५ मध्ये पुढीलप्रमाणे करण्यात आली आहे :

१) सार्वजनिक सुव्यवस्था, नीतिमत्ता व आरोग्य यांच्या व या (म्हणजे मूलभूत हक्काच्या) भागातील अन्य तरतुदींच्या अधीनतेने सदसद्विवेकबुद्धीच्या स्वातंत्र्याला आणि धर्मश्रद्धा ठेवण्याच्या, आचरण्याच्या व त्याचा प्रचार करण्याच्या अधिकाराला सर्व व्यक्ती सारख्याच हक्कदार आहेत.

२) या अनुच्छेदातील कोणत्याही बाबीमुळे—

(क) धर्माचरणाशी निगडित असेल अशा कोणत्याही आर्थिक, वित्तीय, राजनैतिक वा अन्य धार्मिकेतर (Secular) कार्याचे विनियमन करणाऱ्या किंवा त्यावर निर्बंध घालणाऱ्या;

(ख) सामाजिक कल्याण व समाज याबाबत अथवा सार्वजनिक स्वरूपाच्या हिंदू धार्मिक संस्था, हिंदूंचे सर्व वर्ग व पोट-भेद यांना खुल्या करण्याबाबत तरतूद करणाऱ्या, कोणत्याही विद्यमान कायद्याच्या प्रवर्तनावर परिणाम होणार नाही किंवा असा कोणताही कायदा करण्यास राज्याला प्रतिबंध होणार नाही.

**स्पष्टीकरण - एक** - कृपाणे धारण करणे व स्वतः-बरोबर बाळगणे हे शीख धर्माच्या प्रकटीकरणात समाविष्ट असल्याचे मानले जाईल.

**स्पष्टीकरण - दोन** - खंड (२) च्या उपखंड (ख) मध्ये 'हिंदू' या शब्दोल्लेखात शीख, जैन वा बौद्धधर्म प्रकट करणाऱ्या व्यक्तींचा उल्लेख समाविष्ट आहे, असा त्याचा अर्थ लावला जाईल आणि हिंदू धार्मिक संस्थांच्या उल्लेखांचा अर्थही तदनुसार लावला जाईल.[१२]

भारतीय राज्यघटनेतील धर्मनिरपेक्षतेचा आशय स्पष्ट करून त्याचे मजबुतीकरण करणे व त्यातून राष्ट्रीय एकात्मता, लोकशाही, विकास आणि जनकल्याण साधणे. पहिल्या उपकलमानुसार नागरिकाला चार अटी पाळून आपला धर्म (रिलिजन) पाळण्याचे स्वातंत्र्य देण्यात आले आहे. येथे धर्मासाठी रिलिजन ही संज्ञा वापरण्यात आली आहे, हे ध्यानात घ्यावे लागते. 'रिलिजन' याचा अर्थ 'पारलौकिक धर्म' असा आहे. पारलौकिक धर्म म्हणजे तो धर्म की, ज्याचा हेतू पारलौकिक हित साधणे व असे हित साधावे म्हणून काही पूजा, प्रार्थना, विधी, कर्मकांड करणे असा आहे. या पारलौकिक धर्माचा इहलोकाशी संबंध येत नाही. काहीजण यालाच 'उपासना-पद्धती' किंवा 'संप्रदाय' असे म्हणतात. या अर्थाच्या धर्माचा हेतू व अपेक्षित सुख पारलौकिक असले, तरी त्यासाठी करावयाच्या आचारांचा वा विधींचा संबंध इहलोकाशी येत असतो. उदा., देव म्हटला की मंदिर अथवा मशीद येते. प्रार्थना म्हणायची म्हटली तर त्यासाठी आवाज वा ध्वनिक्षेपक येतोच. पूजा म्हटली की त्यासाठी पूजा-साधने आलीच. मिरवणूक वा यात्रा म्हटली की त्याचा इहलोकाशी संबंध आलाच. इतर माणसांशी, भूमीशी, वस्तूशी, वेळेशी, व्यवस्थेशी असलेला संबंध हा ऐहिकच असतो. देवाशी, स्वर्गाशी, नरकाशी, परलोकाशी, अंतरात्म्याशी असलेला संबंध तेवढा पारलौकिक व आध्यात्मिक असतो. हाच धर्म घटनेतील 'रिलिजन' या शब्दात अभिप्रेत आहे. हा पारलौकिक धर्म पाळताना त्याचा इहलोकाशी जो संबंध येतो, त्यासाठी उपकलम १ मध्ये चार अटी घालण्यात आलेल्या आहेत. ते स्वातंत्र्य १) कायदा सुव्यवस्था, २) नीतिमत्ता, ३) आरोग्य, ४) इतरांचे मूलभूत हक्क यांच्या विरोधी नसण्याचे बंधन घालण्यात आले आहे. ही चार बंधने पाळून पारलौकिक अर्थाचा धर्म पाळण्याचे मर्यादित स्वातंत्र्य व्यक्तीला देण्यात आले आहे.

१) कायदा सुव्यवस्था : धर्माप्रमाणे धार्मिक मिरवणुका काढण्याचा, भजन, कीर्तन, मेळावे उभे करण्याचा अधिकार आहे. जर यामुळे कायदा सुव्यवस्थेचा प्रश्न निर्माण होणार असेल, तर या अर्थाचा धर्म पाळण्यास सरकार परवानगी देणार नाही. मिरवणुकीवर, यात्रेवर बंदी घालते. उदा., अमरनाथच्या यात्रेवर शासन नियंत्रण घालते व अनेकांना यात्रेला जाता येत नाही, याचे कारण हेच आहे.

२) दुसरी अट नीतिमत्ता ही आहे. धर्मामध्ये नीतिमूल्ये आलेली आहेत, असे आपण मानतो. नीतिमूल्ये म्हणजे दोन माणसांतील संबंध. उदा., बाप-मुलाचे संबंध, नवरा-बायकोचे संबंध, दोन शेजाऱ्यांतील संबंध किंवा देशातील

कोणत्याही दोन माणसांतील संबंध. हे सारे संबंध आत्तापर्यंत धर्माने ठरविलेले आहेत. हा विषय आता धर्माकडून काढून राज्यघटनेने राज्याकडे दिलेला आहे. त्यामुळे राज्याने सांगितलेल्या नीतिमूल्यांच्या विरोधात धर्मात मानलेली नीतिमूल्ये पाळता येणार नाहीत. राज्याने मानलेली नीतिमूल्ये राज्यघटनेत, लोकसभा-विधानसभांच्या विविध कायद्यांत, शासनाने काढलेल्या विविध आदेशांत व न्यायालयाने दिलेल्या विविध निकालांत आलेली आहेत. स्वातंत्र्य, समता व बंधुता ही त्रिसूत्रे घटनात्मक नीतिमूल्यांचा पाया मानली आहेत. या आधारावर बाकीची सर्व नीतिमूल्ये उभी ठाकली आहेत. मुलामुलींचे लग्न केव्हा करावे, संसारात कसे वागावे, घटस्फोट केव्हा घ्यावा, मुलं-मुली अपत्ये किती असावीत, पत्नीच्या पोटात मुलगा आहे की मुलगी आहे हे तपासणे सर्व काही राज्याच्या अधिकारात आहे. त्यामुळेच चातुर्वर्ण्य, जातिभेद, अस्पृश्यता या गोष्टी आपोआपच धर्माच्या क्षेत्रातून बाद झाल्या. नीतिमूल्ये म्हणजे चांगले काय, वाईट काय, योग्य काय, अयोग्य काय, काय करावे, काय करू नये इ. साऱ्या गोष्टी आता धर्मातून काढून राज्याकडे दिलेल्या आहेत. अमकेच शिक्षण घ्या असा कायदा राज्य करू शकते, सैनिकी शिक्षण, सैन्यात भरती या गोष्टीतर राज्य सक्तीने करू शकतेच शकते. शेतात पीक कोणते घ्यावे अथवा घेऊ नये, याचा कायदाही राज्य करू शकते. नाहीतर मग एखादे विशिष्ट पीक शेतकरी घेणारच नाहीत किंवा नको असणारे पीक मुबलक पिकवतील. स्त्रिया बुरखा घालतात; पण तो धार्मिक हक्क म्हणून नव्हे तर राज्य त्यास हरकत घेत नाही म्हणून होय. परीक्षेच्या दिवशी सगळेच विद्यार्थी देवळात जाऊन 'मला उत्तीर्ण करण्याचे वचन दे, नाहीतर मी येथून हलणार नाही', असे म्हणून देवाचे पाय धरून बसू लागले व परीक्षागृहे ओस पडू लागली, तर परीक्षाकाळात मंदिरात जाण्यास विद्यार्थ्यांना प्रतिबंध करणारा आदेश काढल्याशिवाय शासन सोडणार नाही. नीतिमूल्यांच्या अधीन राहून धर्म पाळला पाहिजे, अर्थ याचा असा आहे.

३) तिसरी अट (वैयक्तिक व सामाजिक) आरोग्याची आहे. राज्यघटनेने आरोग्य हा विषय राज्याच्या अधिकार-क्षेत्रात दिलेला आहे. त्यामुळे धर्मपालन करण्याने आरोग्य (वैयक्तिक व सामाजिक) बिघडत असेल, तर शासन त्यावर नियंत्रण घालू शकते. उदा., कॉलऱ्याची लस टोचणे हे जत्रेला किंवा हजला जाताना आवश्यक करण्यात आले आहे. ती लस आमच्या धर्मानुसार नाही, असा आक्षेप कोणाला घेता येणार नाही. एखादी गोष्ट खाल्ल्याने किंवा पिल्याने माझे आरोग्य चांगले राहते, असे एखाद्यास वाटेल व त्यास त्याच्या धर्मात आधारही असेल; पण ते आरोग्याला घातक आहे असे शासनाला वाटले, तर शासन त्यावर बंदी घालू शकते. उदा., सोमरस किंवा दारू पिणे, आत्मार्पण किंवा आत्मसमर्पण. समाधी घेता येत नाही. तो धर्माचा विषय नाही. पतंजलीयोग हा धर्माचा भाग मानला जातो. योगामुळे जर प्रकृतीस हानी पोचत असेल, तर शासन त्यास बंदी घालू शकते. नैवेद्य, नवस करणे ही भावना धर्माचा विषय; पण त्या नैवेद्यात काय असावे, नवस कशाचा आहे हे पाहण्याचा अधिकार राज्याचा आहे. त्यासाठी तुम्ही नरबळी देणार, का बोकड कापणार, का विषयुक्त शिरा वगैरे नंतर भक्तांना वाटणार, का प्रतिबंधित केलेली मोहाची (यापासून दारू बनवितात) फुले देवाला वाहणार, हे राज्य पाहणारच. एवढेच नाही तर माझे आरोग्य चांगले आहे की नाही, याबद्दल व्यक्ती आणि शासन यांत मतभेद झाला तर शासनाचे मत प्रभावशाली व वरचढ ठरेल. थोडक्यात, आरोग्यविरोधी धर्म नसला पाहिजे. या अटीमुळे धर्मग्रंथांत सांगितलेले आरोग्याविषयीचे सर्व वा काही नियम व आचार निष्प्रभ ठरतात.

४) चौथी अट इतरांचे मूलभूत हक्क ही आहे. रस्त्याने जाणे हा नागरी हक्क आहे आणि मिरवणूक काढणे हा धार्मिक हक्क आहे. यात नागरिकाचा रस्त्याने जाण्याचा नागरी हक्क पाळून मिरवणूक काढता येईल. अन्यथा शासन मिरवणूक काढण्याची परवानगी नाकारेल. म्हणून या अटीच्या अधीन राहून धर्म पाळल्यास उरणारा पारलौकिक धर्म किती शिल्लक राहतो?

आपण कल्याणकारी राज्याचा स्वीकार केलेला आहे. स्वतःचा निर्णय घेण्याचे स्वातंत्र्य मला आहे, पण तो निर्णय माझ्या हिताचा आहे की नाही, हे पाहण्याचा अंतिम अधिकार राज्याला प्रदान केलेला आहे. जसे

लहान मुलाला निर्णय घेण्याचे काही स्वातंत्र्य असते; पण तो निर्णय बरोबर आहे का नाही, हे पाहण्याचे अधिकार पालकाला असतात, तसेच हे आहे. समाजाने नागरिकाला लहानाचे मोठे केलेले असते, त्यांच्या सुखरूप जन्मासाठी मोफत रुग्णालयसेवा, पुढे रोग होऊ नये म्हणून मोफत लसी, पुढे मोफत शिक्षण, जीवनाची व मालमत्तेची सुरक्षितता, भूकबळी पडू नये म्हणून काळजी, संकट व अपघातसमयी मदत, कलागुणांना उत्तेजन, विविध हक्कांचे रक्षण अशा शेकडो गोष्टींची जबाबदारी समाज घेत असतो. म्हणून माझ्या संबंधात माझ्या मनाला येतील ते निर्णय घेण्याचे संपूर्ण स्वातंत्र्य मला राहत नसते. मला स्वतःचे अहित करून घेण्याचे स्वातंत्र्य समाज देत नाही. हे सारे आपण स्वीकारलेले आहे. या स्वीकारातच आपण हे मान्य केले आहे की, धर्म जर माझे ऐहिक अहित करणार असेल, तर तो पाळण्याचा माझा हक्क समाज मान्य करणार नाही. मला धर्म पाळू द्यायचा की नाही, हेही समाजाच्या हातात आहे. शिवाय धर्म म्हणजे काय हे ठरविण्याचा अधिकारही समाजाचाच आहे. इतक्या गोष्टी तत्त्वतः व व्यवहारातः आपण मान्य केलेल्या आहेत. उरलेल्या मान्य कराव्याच लागणार आहेत. या साऱ्याचा अर्थ असा होतो की, व्यक्तीचे व समाजाचे धारण करणारा आजचा जो इहलौकिक धर्म राहणार आहे, तो ठरविण्याचा अधिकार समाजाकडे, राज्याकडे राहणार आहे;. लौकिक नावाच्या कोणत्या धर्माकडे नाही, हे आपण मान्य केलेले आहे. याचा दुसरा अर्थ असा की, आता लौकिक धर्माकडे फक्त 'पारलौकिक व आध्यात्मिक बाबींचे' क्षेत्र शिल्लक राहणार आहे, हे आपण अप्रत्यक्षपणे मान्य केलेले आहे.

अर्थात मनुष्य कितीही बुद्धिवादी व प्रगत असला, तरी वरील अर्थाच्या धर्माची गरज त्याला भासणारच आहे. मनुष्य हा केवळ बुद्धीवर जगणारा प्राणी नाही. सुख, आनंद हा त्याच्या जीवनाचा महत्त्वाचा भाग आहे. देव, परलोक, स्वर्ग, आत्मा, मोक्ष, मुक्ती अशा गोष्टींवर तो श्रद्धा ठेवणारच. मनाच्या समाधानासाठी, आत्मिक सुखासाठी हे आवश्यकच आहे. तेव्हा पारलौकिक व आध्यात्मिक अर्थाचा हा धर्म राहणारच आहे व त्या-पुरताच तो मर्यादित राहिल्यास त्याचा इहलोकातील इतर कोणत्याही गोष्टींवर वाईट परिणाम होणार नसल्यामुळे तो धर्म पाळण्याचा हक्क प्रत्येकाला असलाच पाहिजे. अर्थात त्यासाठी सार्वजनिक कायदा सुव्यवस्था, नीतिमत्ता, आरोग्य व इतरांचे मूलभूत हक्क या घटनात्मक अटींच्या अधीन रहावे लागेल. इहलौकिक जीवनात जेवढा धर्मभाग पाळण्यास राज्य हरकत घेणार नाही, तेवढाच लौकिक अर्थाचा धर्म इहलोकात पाळता येईल.

घटनेला अभिप्रेत असणारा 'धर्म' हा वरील अर्थाचा 'रिलिजन'च आहे, हे उपकलम २ वरून पूर्णपणे स्पष्ट होते. या उपकलमानुसार प्रचलित धर्मातील आदेशाच्या विरोधातही ऐहिक विषयासंबंधात कायदे करण्याचा अधिकार राज्याला देण्यात आला आहे. राजकारण, समाजकारण, अर्थकारण हे विषय तर ऐहिक म्हणून नाव घेऊनच आलेले आहेत. त्याशिवाय शिक्षण, शेती, मालमत्ता, आरोग्य, संरक्षण, न्यायव्यवस्था, कुटुंबकल्याण इ. विषय 'इतर इहलौकिक बाबीं'त आलेले आहेत. धर्म आणि इहलौकिक बाबी या भिन्न आहेत, हे उपकलम २ वरून स्पष्टपणे दिसून येते. नाहीतर 'धर्माशी संबंधित असणाऱ्या इहलौकिक बाबी' अशी शब्दरचना त्यात आली नसती. इहलौकिक बाबींसंबंधीचे संपूर्ण अधिकार राज्याला असतील, त्या संबंधात धर्माचे आदेश विचारात घेतले जाणार नाहीत, असा या उपकलमाचा अर्थ आहे. तेव्हा इहलौकिक विषयासंबंधात धर्म पाळण्याचे स्वातंत्र्य घटनेने आपल्याला दिलेलेच नाही. अर्थात राज्याचा त्यास आक्षेप नसेल तर धर्मातील इहलौकिक बाबीसंबधीचे आदेश व शिकवण पाळता येतील; पण राज्याने त्यास हरकत घेतली व त्या आदेशाविरुद्ध कायदा करायचा असेल तर तो अधिकार राज्याला असेल व त्याविरुद्ध घटनेनुसार कोणालाही धर्मस्वातंत्र्याचा मुद्दा उपस्थित करता येणार नाही. किंबहुना राज्यघटना, त्या घटनेने प्रदान केलेल्या अधिकारानुसार केले जाणारे कायदे व नियम हाच इहलोकासंबंधात 'धर्म' आहे, अशी घटनेची भूमिका आहे. या संबंधात घटनेने फक्त एकाच ऐहिक गोष्टीचा व तोही स्पष्टीकरण देऊन अपवाद केलेला आहे. शीखधर्मीय लोक धर्माज्ञा म्हणून कृपाण बाळगतात. आता कृपाण हे ऐहिक का पारलौकिक? कृपाण हे उघडपणेच ऐहिक

आहे. त्यामुळे उपकलम २ नुसार कृपाणासंबंधात कायदे करण्याचा राज्याला अधिकार प्राप्त झाला असता. परंतु तो होऊ नये अशी घटनाकारांची इच्छा होती. म्हणून त्यांनी एरवी 'ऐहिक' असणारे कृपाण हे 'धार्मिक' म्हणून अपवाद करण्याचा मार्ग निवडला. या घोषणेमुळे कृपाण हे (पारलौकिक या अर्थी) धार्मिक ठरले व उपकलम २ च्या मर्यादेतून मुक्त झाले. कृपाणासंबंधात कायदा करण्याचा राज्याचा अधिकार राहिला नाही. उपकलम १ मधील चार अटींपैकी काहींचा भंग केल्यासच त्यावर बंदी वगैरे आणण्याची कारवाई करण्याचा अधिकार तेवढा शिल्लक उरला. घटनेने याशिवाय एकाही ऐहिक बाबीला अपवाद करून व त्यास पारलैकिक ठरवून राज्याच्या अधिकारक्षेत्रातून काढून धर्मस्वातंत्र्याच्या मर्यादेत आणलेले नाही, हे लक्षात घेतले पाहिजे.

या कलमाचा वर दिलेला अर्थ केवळ आमचा नाही, सर्वोच्च न्यायालयानेही हाच अर्थ दिलेला आहे. १९९४ मध्ये सर्वोच्च न्यायालयाच्या नऊ न्यायमूर्तींच्या घटनापीठाने स्पष्टपणे असा निकाल दिला आहे की, घटनेनुसार ऐहिक क्षेत्र हे राज्याचे आहे व धर्माचा अधिकार व स्वातंत्र्य हे फक्त पारलौकिक व आध्यात्मिक विषयापुरते मर्यादित आहे. राज्याच्या दृष्टीने धर्म ही गैरलागू बाब आहे, असे त्यात म्हटले आहे. ऐहिक विषयासंबंधात कायदे करण्याचा राज्याला सार्वभौम अधिकार आहे. ते करताना कोणाचा धर्म कोणता आहे व त्यात काय म्हटले आहे हे राज्य पाहणार नाही, असेही त्यात स्पष्ट करण्यात आले आहे. बाबरी मशीद प्रकरणी (AIR १९९४ SC १९१८) सर्वोच्च न्यायालयाच्या नऊ न्यायमूर्तींच्या निकालातील अर्थ आम्ही काढलेल्या अर्थावर शिक्कामोर्तब करणाराच आहे. धर्मनिरपेक्षतेसंबंधी सर्वोच्च न्यायालय म्हणते, 'घटनेने सर्व ऐहिक (Secular) बाबी धर्मापासून वेगळ्या केल्या आहेत. धर्माच्या बाबी राज्याच्या कोणत्याही ऐहिक बाबींत मिसळू शकणार नाहीत. धर्माचे ऐहिक बाबींवरील अतिक्रमण पूर्णपणे प्रतिबंधित केलेले आहे. धार्मिकेतर (Non-religious) व इहवादी (Secular) क्षेत्रात धर्माचा हस्तक्षेप शासन होऊ देणार नाही. धर्मस्वातंत्र्य व धर्मसहिष्णुता ही ऐहिक जीवनापेक्षा वेगळ्या असलेल्या आध्यात्मिक (Spiritual) जीवनापुरतीच मर्यादित आहे. ऐहिक जीवन हा प्रांत केवळ (Exclusively) शासनाच्या अधिकार क्षेत्रातला आहे. शासनाच्या दृष्टीने एखाद्या व्यक्तीची धर्मश्रद्धा ही गैरलागू (Immaterial) बाब आहे. शासनाच्या व्यवहारात धर्माला स्थान नाही. घटनेने धार्मिक बाबी खाजगी बाब म्हणून व्यक्तीकडे व धर्मनिरपेक्ष (Secular) बाबी शासनाकडे सुपूर्द केल्या आहेत. शासनाला धर्मात हस्तक्षेप करण्याचा अधिकार देण्यात आला आहे. मंदिर, मशीद व इतर पूजास्थाने वा मठ यांच्या ऐहिक कारभारासंबंधात कायदे करण्याचा राज्यास अधिकार आहे. (समान नागरी कायद्यासंबंधीच्या) कलम ४४ च्या आज्ञेची दखल अद्याप घेतली गेलीच नाही. तेव्हा धर्मनिरपेक्षता हे मनुष्याच्या वैयक्तिक श्रद्धेचे क्षेत्र ऐहिक व भौतिक जीवनापासून वेगळे करते. [१३]

सरला मुदगल प्रकरणी (AIR १९९५ SC १५३१) सर्वोच्च न्यायालयाने म्हटले आहे की, "विवाह, वारसा आणि अशाच सेक्यूलर स्वरूपाच्या बाबी घटनेतील २५ व्या कलमाच्या धर्मस्वातंत्र्याच्या व्याप्तीत येत नाहीत." ज्या रिलिजनचे स्वातंत्र्य घटनेने दिले आहे त्याची व्याख्या करताना न्यायालय म्हणते, "रिलिजन (धर्म) म्हणजे काय? धर्म म्हणजे एखादी श्रद्धा .... रामायण, पवित्र कुराण, बायबल किंवा गुरू ग्रंथसाहिब यांचे वाचन किंवा पठण करणे..... देवीला नैवेद्य देणे किंवा मूर्तीला स्नान घालणे, तिला वस्त्र नेसविणे किंवा मंदिर, मशीद, गुरुद्वार यांत प्रार्थनेसाठी जाणे या त्या धर्मांच्या बाबी होत." [१४] अशा पारलौकिक अर्थाच्या धर्माचे स्वातंत्र्य कलम २५ नुसार घटनेने दिले आहे, असे न्यायालयाचे म्हणणे आहे.

'सेक्युलर' बाबी कोणत्या आहेत हे नेमके समजण्यासाठी आंध्र प्रदेशातील बालाजी मंदिर पुजारी प्रकरणातील सर्वोच्च न्यायालयाचा निकाल (AIR १९९६ SC १७६५) अतिशय महत्त्वाचा ठरतो. शासनाने एक कायदा करून तेथील पुजाऱ्यांची वंशपरंपरा रद्द केली. गुणवत्ता, प्रशिक्षण, निवड, वेतन, सेवाशर्ती इ. च्या आधारावर शासकीय नोकराप्रमाणे तेथील पुजारी नेमण्याची तरतूद केली. पुजारी कोण असावा, ही धार्मिक बाब असून, त्याला कलम २५ चे संरक्षण आहे व त्या संबंधात






असा कायदा शासनाला करता येत नाही, असा आक्षेप या प्रकरणी पुजाऱ्याने घेतला होता. यासंबंधात न्यायालय म्हणते, "सेक्युलर बाबी वा कृती या 'धर्म' होत नाहीत.... पूजेची कृती व पूजा करणारी व्यक्ती यांत फरक आहे.... पूजेची पद्धत ही धार्मिक बाब आहे व त्या संबंधात राज्य कायदा करू शकत नाही, परंतु पुजाऱ्याची नोकरी ही सेक्युलर बाब आहे... म्हणून त्यासंबंधी कायदे करता येतात."[१५] न्यायालयाची कारणमीमांसा अशी की, "पुजाऱ्याची नेमणूक, त्याचे कामाचे तास, त्याचे वेतन, सेवाशर्ती, वर्तणूक, निलंबन इ. नोकरीसंबंधात असणाऱ्या बाबी 'सेक्युलर' आहेत. पुजारी पूजा करणारा असला तरी तो देवस्थानाच्या इतर नोकरांप्रमाणेच आहे. त्यासंबंधात धर्मस्वातंत्र्य असू शकत नाही." अशा प्रकारे पुजारी कोण असावा, हा धर्माचा भाग नसल्याचे ठरवून न्यायालयाने शासनाचा कायदा वैध ठरविला.

अयोध्या प्रकरणीच्या सुप्रसिद्ध निकालात (AIR1995 SC ६०५)मशिदीची जागा शासनाला अधिग्रहित करता येते का नाही, याची अशीच कारणमीमांसा आहे. यासंबंधात न्यायालय म्हणते, "कलम २५ नुसार असलेल्या धर्मस्वातंत्र्याच्या हक्कांत (मशिदीसाठी) स्थावर भूमी धारण करण्याचा हक्क येत नाही. त्याचप्रमाणे धार्मिक प्रार्थनेचा हक्क म्हणजे कोणत्याही व प्रत्येक जागेवर प्रार्थनेचा हक्क नव्हे!..... पूजा व प्रार्थना धर्माचा भाग आहे, परंतु ती कुठे करावी हा धर्माचा भाग नाही.....सेक्युलर असल्यामुळे मशिदीच्या जागेलाही मालमत्तेचे कायदे लागू होतात.....म्हणून राज्याला कायदा करून मशिदीची जागाही संपादित करता येते."[१६] अशा प्रकारे नमाज हा 'धार्मिक', तर नमाजाची जागा 'सेक्युलर' असे ठरवून न्यायालयाने शासनाचा कायदा वैध ठरविला. एखाद्या कृतीत एकत्रित असलेला 'धार्मिक' व 'सेक्युलर' भाग वेगवेगळा करून स्वतंत्रपणे त्याचा विचार करण्याची राज्यघटनेची व न्यायालयाची ही पद्धत नीट समजावून घेतली पाहिजे.

केरळ उच्च न्यायालयाच्या दोन न्यायमूर्तींच्या खंडपीठाने नोव्हेंबर १९९९ मध्ये एक निकाल दिला आहे. महाराष्ट्राप्रमाणेच केरळमध्येही 'इमारती भाडे नियंत्रण कायदा' आहे. मालकांनी मनमानीपणे केव्हाही काढू नये, यासाठी भाडेकरूंना काही विशेष हक्क व संरक्षण देण्यात आलेले आहे. तथापि, या कायद्यातून काही इमारतींना सूट देण्याचा विशेष अधिकार राज्य शासनाला देण्यात आला आहे. या अधिकाराचा उपयोग करून केरळ शासनाने एक आदेश काढला व त्यानुसार धार्मिक अल्पसंख्याकांच्या धर्मसंस्थांच्या इमारतींना या कायद्याच्या तरतुदींतून वगळण्यात आले. त्यात चर्च व ख्रिश्चन बिशप यांच्या अधिकारातील इमारती, ख्रिश्चन संस्थांच्या इमारती, ख्रिश्चन धर्मगुरूंचे मठ, मुस्लिम वक्फ बोर्डाच्या इमारती, मशिदींच्या व मदरशांच्या मालकीच्या इमारतींचा समावेश आहे. याचा परिणाम असा झाला की, या इमारतीत राहणारे जे हिंदू भाडेकरू होते, त्यांना कायद्याचे संरक्षण न राहिल्याने कोणताही कायद्याचा मार्ग न चोखाळता तेथून हाकलून देण्याचा हक्क मालकांना प्राप्त झाला. भाडेकरूंनी त्या आदेशाला न्यायालयात आव्हान दिले. इमारती भाड्याने देणे हा धार्मिक प्रश्न नसून ऐहिक (Secular) प्रश्न आहे, त्यामुळे ऐहिक विषयासंबंधात धार्मिक आधारावर असा आदेश शासनाला काढता येत नाही. तसे करणे सेक्युलॅरिझमच्या विरोधी आहे. असे आक्षेप त्यांच्यातर्फे घेण्यात आले. न्यायालयाने हे आक्षेप मान्य करून शासनाचा तो आदेश घटनाबाह्य ठरविला.

उच्च न्यायालय म्हणते, "चर्चच्या किंवा मशिदींच्या या ज्या इमारती आहेत, त्यांचा वापर (धार्मिक कारणाकरिता होत नसून) शुद्ध व्यापारी उद्देशाकरिता होत असल्यामुळे त्यांना (त्या कायद्यातून ) सूट देण्याच्या वर्गात आणता येणार नाही. तसे करणे हे धर्मनिरपेक्षतेच्या मूलभूत तत्त्वाविरुद्ध ठरते. त्यामुळे धर्माच्या आधारावर सूट मिळालेल्या समाजांना इतरापेक्षा अधिक लाभ मिळालेला आहे. केवळ धर्माच्या आधारावर मालकांचा एक वर्ग करून त्यांना वेगळे करून सूट देता येत नाही. चर्च व मशिदींच्या इमारती या व्यापारी कारणासाठी वापरल्या जात आहेत. यापासून मिळणारे उत्पन्न धार्मिक संस्थांना मिळत असेल, तरी तेवढ्यामुळे त्यांना अशी सूट देता येणार नाही. (धार्मिक संस्था या एका कारणाशिवाय ) या आदेशाच्या न्याय्य समर्थनार्थ शासनाने इतर कोणताही काडीइतकाही पुरावा न्यायालयासमोर

आणलेला नाही." न्यायालय पुढे म्हणते, "हा आदेश काढताना शासन हे अयोग्य पद्धतीने वागलेले आहे व कसलाही विचार न करता त्याने मनमानीपणे हा आदेश काढलेला आहे.[१७] न्यायालयाच्या मते मालकांचा विचार न करता विशिष्ट इमारतींचा एक वर्ग करून त्यांना सूट देणे कायदेशीर ठरले असते. (उदा., ५० वर्षांपेक्षा अधिक वयाच्या इमारती किंवा ज्यांचे उत्पन्न मानवीय वा धर्मादाय कामाकरिता वापरले जाते, अशा इमारती.)

न्यायालयाच्या या निकालाचा अर्थ असा की, धर्म किंवा धर्मसंस्था यासंबंधात आदेश काढताना शासनाला आधी धार्मिक आणि ऐहिक अशी विभागणी करावी लागेल. धार्मिक विषयासंबंधात हस्तक्षेप करता येणार नाही, पण ऐहिक विषयात तो करता येईल. पण हा हस्तक्षेप करताना धर्माच्या आधारावर पक्षपात करता येणार नाही. थोडक्यात, ऐहिक विषयासंबंधात धर्मस्वातंत्र्य नसते, यावर शिक्कामोर्तब करणारा हा निकाल आहे. इमारती भाड्याने देणे हा विषय ऐहिक आहे, त्यापासून मिळणारे उत्पन्न ऐहिक आहे; त्यामुळे त्या संबंधात एका बाजूने धर्मस्वातंत्र्याचा प्रश्न निर्माण होत नाही, तर दुसऱ्या बाजूने धर्माच्या आधारावर पक्षपात करणारा आदेश काढता येत नाही, असा या निकालाचा अर्थ आहे.

कलकत्ता उच्च न्यायालयाच्या खंडपीठाचा एक निकाल असा आहे. मशिदींवर ध्वनिक्षेपक लावण्यासंबंधीचा पूर्वीच लागलेला हा निकाल आता पूर्णपणे निवाडा-ग्रंथात प्रसिद्ध झालेला आहे (AIR १९९९ Cal १५). 'पर्यावरण संरक्षण नियमां'मध्ये आवाजाचे प्रदूषणसुद्धा नियंत्रित करण्यात आले आहे. उच्च न्यायालयासमोर १९९६ मध्ये एक प्रकरण आले असताना न्यायालयाने आदेश दिला होता की, 'रात्री ९ ते सकाळी ७ या वेळात (प. बंगाल) राज्यात, अत्यावश्यक शासकीय कर्तव्यासाठी सार्वजनिक अधिकाऱ्यांशिवाय इतर कोणालाही ध्वनिक्षेपक वापरता येणार नाही." न्यायालयाने प. बंगाल प्रदूषण नियंत्रण मंडळाला आदेश दिला की, त्यांनी नेहमीकरिता ध्वनीची तीव्रता मर्यादित ठेवण्यासाठी उपाययोजना करावी. जिल्हा दंडाधिकारी व इतर पोलीस अधिकारी यांनी ध्वनिक्षेपकास परवानगी देताना प्र. नि. मंडळाच्या अटींचे पालन करावे. अधिकाऱ्यांनी या आदेशाची अंमलबजावणी सुरू केली. याचा परिणाम अर्थातच मशिदींवरील ध्वनिक्षेपकांवर झाला. शासकीय अधिकाऱ्यांनी रात्रीच्या काळात मशिदींवर ध्वनिक्षेपक वापरण्यास प्रतिबंध केला.

काही मशिदींच्या प्रमुखांनी व मोलवींनी याविरुद्ध कलकत्ता उच्च न्यायालयातच याचिका दाखल केली. म्हणजे याच न्यायालयाच्या (एका न्यायमूर्तीच्या) निकालाविरुद्ध दाखल केलेली ही याचिका होती.अर्थात ही याचिका निर्णयासाठी दोन न्यायमूर्तींच्या खंडपीठाकडे वर्ग झाली. याचिकेत म्हटले होते की, "नमाज हा इस्लामचा दुसरा स्तंभ आहे .... सर्व अनिवार्य नमाजांसाठी (म्हणजे दिवसांतून पाच वेळा) अजान (निमंत्रण) आवश्यक आहे व (त्यात) मोठ्या आवाजात सर्व इस्लाम-श्रद्धावानांना नमाजासाठी बोलाविले जाते."[१८] पूर्वी प्रेषितांच्या काळी तोंडाने मोठा आवाज काढून अजान म्हटले जात असले, तरी आज लोकसंख्या वाढल्यामुळे त्यासाठी ध्वनिक्षेपकाचा उपयोग अनिवार्य झाला असल्याचे सांगून अजानसाठी ध्वनिक्षेपक वापरणे हा घटनेच्या (धर्मस्वातंत्र्याच्या) कलम २५ नुसार प्रदान केलेला मूलभूत हक्क आहे, असा त्यांच्यातर्फे न्यायालयात दावा करण्यात आला. (इतर) नागरिकांनी अन्य धर्मांविषयी व प्रथांविषयी काहीशी सहिष्णुता व संयम दाखविला पाहिजे, असेही त्यांच्यातर्फे मांडण्यात आले. मशिदीवरील ध्वनिक्षेपकां-संबंधीचा आदेश घटनाबाह्य आहे व रात्रीच्या वेळची नियंत्रणे उठविण्यात यावीत, अशी मागणी याचिकेत करण्यात आली.[१९]

खंडपीठाने हे सारे आक्षेप व याचिका फेटाळून लावली. पूर्वीचा निकाल कायम केला. शिवाय, मशिदी-संबंधात स्वतंत्र आदेश जारी केले. यासंबंधात पूर्वीचे निकालही उद्धृत करीत न्यायालयाने जी कारणमीमांसा केलेली आहे, ती अतिशय मूलगामी स्वरूपाची असून, प्रत्येक राज्यासाठी, भारतासाठी, न्यायालयासाठी मार्गदर्शक ठरणारी आहे.

पूर्वीच्या निकालावर शिक्कामोर्तब करताना न्यायालय म्हणते, "हा विचार करण्याचा प्रश्न आहे की, सार्वजनिक ठिकाणी (काहींना ध्वनिक्षेपक वापरण्याची जिथे





अनुक्रमणिका

पोलिसांनी) परवानगी दिली आहे, तेथील (इतर) जनता हे काय कैदी -श्रोते (Captive audience or listeners) आहेत की काय ?.... जर उच्च आवाजात ध्वनिक्षेपक वापरण्याची परवानगी दिली, तर त्यामुळे नागरिकांचा इतरांशी बोलण्याचा, वाचन करण्याचा, जाणून घेण्याचा, झोपण्याचा, विश्रांती घेण्याचा किंवा इतर कोणत्याही प्रकारे विचार-चिंतन करण्याचा हक्क नाकारला जातो. एखाद्या व्यक्तीने वा संस्थेने साधा अर्ज करून स्थानिक (पोलीस) अधिकाऱ्यांकडून ध्वनिक्षेपक वापरण्याची परवानगी घेतली म्हणजे काय त्यांना ध्वनिक्षेपक लावण्याचा हक्क मिळतो की काय? हा प्रश्न केवळ कायदा व सुव्यवस्थेचा आहे की काय? ते ध्वनिप्रदूषण निर्माण करीत नाहीत काय? ते नागरिकांच्या उघड हक्कांवर गदा आणीत नाहीत काय? ..... (अशी परवानगी व ध्वनिक्षेपकवापर )म्हणजे नागरिकांना कैदी-श्रोता बनविणे होय." [२०]

ध्वनिक्षेपक वापरणाऱ्यांचा व इतर नागरिकांच्या परस्परविरुद्ध हक्कांसंबंधी न्यायालय पुढे म्हणते, "घटनेने कलम १९ (१) (अ) नुसार प्रदान केलेल्या भाषण व अभिव्यक्ती स्वातंत्र्यामध्ये (कोणाचे) न ऐकण्याचे वा शांत राहण्याचे स्वातंत्र्य अपरिहार्यपणे समाविष्ट आहे.... इतरांचे हक्क रद्द करून वा काढून घेऊन एखाद्या व्यक्तीला वा संस्थेला ते हक्क प्रदान करण्याचे अधिकार कोणताही स्थानिक अधिकारी वापरू शकत नाही.... प्रत्येक नागरिकाला भाषण स्वातंत्र्याचा हक्क इच्छुकांच्या मनापर्यंत जाण्यासाठी दिलेला आहे. अनिच्छुकांवर दडपण आणण्यासाठी नव्हे. [२१]

ध्वनि-प्रदूषणाबद्दल न्यायालय म्हणते, "हे निर्विवाद आहे की, ध्वनी हे एक प्रदूषण आहे. त्याचा मानवी शरीरावरील प्रतिकूल व घातक परिणाम सर्वज्ञात आहे. त्याचा मनुष्याच्या मनोव्यवस्थेवरही भयंकर वाईट परिणाम होत असतो.... ध्वनिक्षेपक असा मोठा आवाज प्रक्षेपित करतात की, जो अर्धा ते एक कि.मी. अंतरापर्यत जातो. घटनेचे कलम १९ (१) पाहता जिल्हा दंडाधिकारी किंवा पोलीस अधिकारी हे शेजारी नागरिकांच्या मूलभूत हक्कांचा विचार न करता एखाद्याला ध्वनिक्षेपक वापरण्याची परवानगी देणारे सर्वाधिकारी नव्हेत. ध्वनिक्षेपक वापरण्यास परवानगी देऊन हे अधिकारी नागरिकांना कैदी-श्रोते बनवू शकत नाहीत..... नागरिकांना विश्रांती घेण्याचा, न ऐकण्याचा, शांततेचा हक्क आहे. ध्वनिक्षेपकाच्या वापरामुळे त्यांचे हे हक्क हिरावले जातात... परिणामतः कोणत्याही अधिकाऱ्याला शेजारी नागरिकांचे वा त्या भागातील एकूण जनतेचे हक्क लक्षात न घेता ध्वनिक्षेपकांना परवानगी देण्याचा अधिकार नाही." [२२] न्यायालयाने पुन्हा पुन्हा ठासून एक मुद्दा मांडलेला आहे की, "भारतीय घटनेप्रमाणे नागरिकांला झोप वा विश्रांती घेण्याचा हक्क आहे. झोपेचा हक्क हा केवळ (घटनात्मक) मूलभूत मानवी हक्क आहे." [२३] रात्रीच्या वेळी किंवा पहाटे मोठ्याने अजान देऊन नागरिकांची झोप मोडण्याचा कुणालाच हक्क नाही व हा हक्क बजावण्यासाठी ध्वनिक्षेपकास परवानगी देण्याचा शासकीय अधिकाऱ्यांना अधिकार नाही, असे न्यायालयाने ठाम प्रतिपादन आहे. म्हणून या निकालाने न्यायालयाने जिल्हा दंडाधिकाऱ्यांना वा पोलिसांना असलेले हे अधिकारच काढून घेतले आहेत.

उच्च न्यायालयाने हेही दाखवून दिले आहे की, अजान (निमंत्रण ) हा इस्लामचा अविभाज्य भाग आहे; परंतु अजानसाठी ध्वनिक्षेपकाचा उपयोग हा इस्लामचा अविभाज्य भाग नाही..... (घटनेप्रमाणे धर्मप्रसाराचा हक्क आहे) परंतु अजान हा काही धर्मप्रसाराचा प्रकार नव्हे. [२४] मुस्लिमांच्या ध्वनिक्षेकाच्या हक्काबद्दल न्यायालय म्हणते, "इतरांचे हक्क हिरावून घेण्याचा किंवा त्यांच्या मूलभूत हक्कांमध्ये व्यत्यय आणण्याचा हक्क कोणालाच मागता येणार नाही. पर्यावरण (संरक्षण) कायदा व त्याखालील नियम हे घटनेच्या १४ व २५ कलमांचा भंग करणारे आहेत, हे (वादीचे) म्हणणे पूर्णपणे विपर्यस्त आहे. या कायद्यामुळे व नियमामुळे कोणताही भेदभाव होत नाही. उलट, अतिरिक्त ध्वनीच्या प्रदूषणापासून संरक्षण मिळविण्याचा घटनेच्या कलम १९ (१) (अ) नुसार प्रत्येक नागरिकाला मूलभूत हक्क आहे." अशी नियंत्रणे प. बंगालमधील मशिदींवरच का, या युक्तिवादासंबंधी न्यायालय म्हणते, "ध्वनिक्षेपकांच्या वापरावर नियंत्रणे या न्यायालयाने घातलेली आहेत. केंद्रीय व राज्य प्रदूषण नियंत्रण मंडळांनी व सर्व संबंधितांनी

अनुक्रमणिका

कोणतीही किंमत देऊन न्यायालयाच्या या आदेशाची अंमलबजावणी केली पाहिजे. केवळ भारताच्या इतर भागांत असे प्रतिबंध घातलेले नाहीत व घटनेतच्या १९ (१) (अ) या कलमाची काटेकोर अंमलबजावणी फक्त प. बंगालमध्येच होत आहे, हा कोणत्याही प्रकारे (पक्षपाती) भेदभावाचा मुद्दा होऊ शकत नाही."[२६]

याचिका फेटाळून न्यायालयाने पुन्हा पुढीलप्रमाणे आदेश दिले, "हे स्पष्ट करण्यात येते की, या आदेशापासून जर कोणी ध्वनिक्षेपकांवर (न्यायालयाने) लादलेल्या नियंत्रणाचा भंग करील, तर पोलीस अधिकाऱ्यांना निर्देश देण्यात येत आहेत की, त्यांनी लगेच ती ध्वनिक्षेपणाची साधने जप्त करावीत, मग ते ध्वनिक्षेपक कुठेही असोत. आणि त्या कृतीचा अहवाल न्यायालयात सादर करावा, जेणेकरून त्या उल्लंघनकारांविरूद्ध कठोर कारवाई करता येईल. तसेच राज्यातील सर्व पोलीसस्थानक-प्रमुखांना आदेश देण्यात येतो की, त्यांनी राज्यातील सर्व मशिदींवर पहारा (watch) ठेवावा व सकाळी ७ पूर्वी ते ध्वनिक्षेपक वापरतात काय, हे पाहिले जावे व त्या आदेशात नमूद केल्याप्रमाणे कारवाई केली जावी. तसेच राज्यातील सर्व जिल्हा पोलीसप्रमुखांना व कलकत्ता शहराच्या पोलीस आयुक्ताला निर्देश देण्यात येत आहेत की, त्यांनी त्यांच्या अधिकारक्षेत्रातील प्रत्येक पोलीसस्थानकाच्या कार्यक्षेत्रातील प्रत्येक मशिदीसंबंधीचा अहवाल मागवून दोन आठवड्यांत या न्यायालयात सादर करावा..... या आदेशातील निर्देश राज्य प्रदूषण नियंत्रण मंडळाने त्वरित सर्व संबंधितांस व जनतेस व मशिदींच्या प्रमुखांस रेडिओ व दूरदर्शन आणि नोटिशींद्वारे कळविण्यात यावेत. जर कोणी या आदेशाचा भंग करील, तर त्याच्याविरुद्ध अतिशय कडक कारवाई केली जाईल. या आदेशाची अंमलबजावणी करण्यात जर प्रशासनाकडून कोणती दिरंगाई झाली तर ती गोष्ट अतिशय गंभीरपणे घेतली जाईल."

संबंधित कलमावर घटनासमितीत भाषण करताना के. एम. मुन्शी म्हणाले होते, "आम्हाला धर्माची वैयक्तिक कायद्यापासून फारकत करावयाची आहे..... वैयक्तिक कायद्याचा धर्माशी काय संबंध आहे? प्राचीन काळी धर्माचाच अधिकार सर्व क्षेत्रांवर चालत असे... ते बंद करून आपण आता म्हटले पाहिजे की, या गोष्टी धर्माच्या नव्हे तर शुद्ध सेक्युलर स्वरूपाच्या आहेत." या मताला डॉ. आंबेडकरांनी घटनासमितीत पाठिंबा दिला. डॉ आंबेडकर भाषणात आणखी म्हणाले होते की, "दुर्दैवाने या देशातील धर्म हे केवळ असामाजिक (non social) नव्हते, तर समाजविरोधी (anti social) आहेत."[२८]

तेव्हा, घटनेनुसार धर्म हा पारलौकिक व आध्यात्मिक बाबींपुरता मर्यादित आहे व तेवढ्याच अर्थाचे धर्माचे स्वातंत्र्य घटनेने दिलेले आहे. आपण राज्यघटना सार्वभौम मानणार असू, तर धर्माचा वा धर्मस्वातंत्र्याचा हा अर्थही मानावा लागेल. धर्म हा पारलौकिक व आध्यात्मिक बाबींपुरता मर्यादित ठेवणे व ऐहिक बाबींचे क्षेत्र राज्याकडे सोपविणे यालाच सेक्युलॅरिझम म्हणतात. भारताची राज्यघटना सेक्युलर आहे, किंवा भारत हे सेक्युलर स्टेट आहे याचा घटनाप्रणीत अर्थ असा आहे की, सर्व ऐहिक विषयांसंबंधीचे सर्वाधिकार राज्याकडे आहेत. धर्माधर्मांची जी काही भांडणे असतात, ती इहलौकिक विषयासंबंधातच असतात. पारलौकिक विषयासंबंधी नसतात. सारे इहलौकिक क्षेत्र राज्याच्या अधिकारकक्षेत दिल्यास इहलोकातील धर्माधर्मांची भांडणेच संपून जातात.[२९] कोणाला पटो वा न पटो; पण भारतीय राज्यघटनेची धर्माविषयीची भूमिका ही अशी आहे! आमचा धर्म हा संपूर्ण जीवनमार्ग आहे, या भूमिकेला छेद देणारी व नाकारणारी ही भूमिका आहे.

प्रथमदर्शनी ही भूमिका कोणत्याही धार्मिक मनुष्याला पटण्यासारखी नाही. ही भूमिका राज्यघटनेतील आहे, हेही त्यांना पटणार नाही. परंतु हे वास्तव त्यांना पटवून घेणे भागच आहे. गमतीची गोष्ट ही की, अशा परिभाषेत राज्यघटनेतील सेक्युलॅरिझम आपण मांडीत नसलो, तरीही व्यवहारातः मात्र तोच सेक्युलॅरिझम आपण मानीत असतो. प्रत्यक्षात सर्व इहलौकिक क्षेत्र आपण राज्याच्या स्वाधीन करून टाकलेले आहे. प्रत्यक्षतःही राज्य हे आपल्या सर्व इहलौकिक जीवनात विविध कायद्यांच्या रूपाने हस्तक्षेप करीत असते. मीठ कोणते खावे? तंबाखू खावी की नको? शिरस्त्राण घालावे की नाही? उपोषण करावे की नाही? इथपासून सर्व गोष्टींवर राज्याचे नियंत्रण आहे. उपोषण करण्याचा किंवा








आत्महत्या करण्याचा वा समाधी घेण्याचाही आपल्याला हक्क नाही. धर्म ही वैयक्तिक वा घरगुती बाब आहे, हे घटनेला मान्य नाही. वैयक्तिक वा घरातील ऐहिक जीवनही आपण राज्याच्या स्वाधीन करून टाकलेले आहे. एखादी वैयक्तिक गोष्ट तुम्हाला चांगली, आपल्या हिताची वाटली; परंतु तीच गोष्ट राज्याला तुमच्या अहिताची वाटली, तर राज्याचा अधिकार तुमच्या हक्कापेक्षा प्रभावी ठरतो. राज्याने ती गोष्ट प्रतिबंधित केली तर तुम्हाला ती करता येणार नाही. हे सारे आपण व्यवहारात, नकळत का होईना, बहुतांश प्रमाणात मान्य करीतच आहोत. थोडक्यात, सेक्युलॅरिझमचा वर जो अर्थ दिला आहे, तोच आज प्रत्यक्षात आचरिला जात आहे; मात्र या भाषेत धर्मस्वातंत्र्याचा हक्क सांगण्याची आपली पद्धत नाही. जे प्रत्यक्षतः आचरित आहोत ते, तत्त्वतः मान्य करण्याची आपल्या मनाची तयारी नाही, एवढाच याचा अर्थ होतो. [३०]

घटनेची ही भूमिका आपण तत्त्वतः व स्पष्टपणे मान्य करणार आहेत की नाही, हा महत्त्वाचा प्रश्न आहे. आपला धर्म फक्त पारलौकिक व आध्यात्मिक विषयांपुरता मर्यादित राहावा व ऐहिक विषयांचे क्षेत्र धर्मातून वजा करून राज्याकडे सोपवावे, ही गोष्ट कोणत्याही धार्मिक मनुष्याला तत्त्वतः न पटणारी व सहन होणारी नाही. मुसलमानांचा विचार थोडा वेळ बाजूला ठेवला, तरी प्रबोधनाची परंपरा लाभलेल्या व स्वतःला जन्मजात सेक्युलर म्हणवून घेणाऱ्या हिंदुसमाजानेही भारतीय घटनेची ही भूमिका तत्त्वतः स्वीकारलेली आहे, असे म्हणता येणार नाही. इहलौकिक गोष्टींसंबंधात संसदेत केलेले कायदे तो मान्य करतो, समान कायदा केला पाहिजे अशी मागणीही करतो; पण घटनेनुसार 'धर्म' हा फक्त पारलौकिक व आध्यात्मिक बाबींपुरता मर्यादित आहे, हे तत्त्वतः तो मान्य करीत नाही. 'आमचा धर्म हा संपूर्ण जीवनमार्ग आहे', हीच भूमिका तो मांडीत असतो. ही भूमिका घटनेच्या विरोधी जाणारी आहे, अनेक प्रश्नांना व समस्यांना जन्म देणारी आहे, इतर धर्मांविषयीचे अज्ञान प्रकट करणारी आहे, हेही आपल्या लवकर लक्षात येत नाही. 'सर्वधर्मसमभाव' ही भूमिका बरोबर आहे; पण भारतीय घटनेनुसार त्यातील धर्माचा अर्थ आध्यात्मिक वा पारलौकिक धर्म असा आहे, हे आपल्या लवकर लक्षात येत नाही. असा अर्थ घेतला तर 'सेक्युलॅरिझम' म्हणजे 'धर्मनिरपेक्षता' ही भूमिका स्वीकारता येऊ शकते. आध्यात्मिक वा पारलौकिक अर्थाच्या धर्मासंबंधातच (त्याचा इहलोकात परिणाम होत नसल्यामुळे) राज्य हे निरपेक्ष म्हणजे तटस्थ राहू शकते. परंतु इहलौकिक विषयांत ते तटस्थ वा निरपेक्ष राहू शकत नाही. 'राज्याला धर्म नसतो', या विधानातील 'धर्म' याचा अर्थ आध्यात्मिक वा पारलौकिक धर्म असाच घ्यावा लागतो. 'सर्व धर्म समान आहेत', यातील 'धर्मा'चा अर्थही पारलौकिक व आध्यात्मिक धर्म असाच घ्यावा लागतो. तेव्हा भारतीय घटनेची ही भूमिका आपल्याला समजून व पटवून घ्यावी लागेल, स्वीकारावी लागेल. ही भूमिका पटण्यासाठी भारतीय घटनेबरोबरच व स्वतःच्या धर्माबरोबरच इतर सर्व धर्मांचा अभ्यासही आवश्यक आहे. जर आपणाला विविध धर्मांची माहिती नसेल, तर आपल्या घटनेने धर्माविषयीची अशी भूमिका का स्वीकारली आहे, हे आपल्याला कळणार नाही, असे नरहर कुरुंदकर आग्रहपूर्वक प्रतिपादन करतात. [३१] या दृष्टीने हा प्रबंध घटनेतील खरी धर्मनिरपेक्षता समजून, पटवून घेण्याला व तो स्वीकारण्याला सर्वांना प्रवृत्त करील, अशी आम्हाला आशा आहे.

भारत हा बहुधर्मीय देश असून पुढेही तो तसाच राहणार आहे. आपापले धर्म पाळत सर्वांना भारतीय घटनेच्या अधिकाराखाली एकत्र राहावयाचे आहे. सामाजिक सामंजस्य, राष्ट्रीय एकात्मता, धर्म आणि आधुनिकता यांचा समन्वय, समाजकल्याण व सामाजिक सुधारणा, पारलौकिक व इहलौकिक अशा दोन्हीही सुखांची प्राप्ती, श्रद्धा आणि बुद्धी, परंपरा आणि प्रगती, स्वधर्मपालन (वा स्वधर्माभिमान) आणि परधर्मसहिष्णुता (वा परधर्मादर) या दोन्हीही गोष्टींचा स्वीकार इत्यादी सर्व बाबी भारतीय राज्यघटनेच्या अधिकाराखालीच साध्य होणाऱ्या आहेत. भारताच्या राज्यघटनेतील धर्मनिरपेक्षता आपण पूर्णार्थाने स्वीकारणार आहोत की नाही, हाच महत्त्वाचा प्रश्न आहे.

यासाठी सर्वांना वस्तुनिष्ठ, अभ्यासू व परस्परांना

समजून घेण्याची भूमिका स्वीकारावी लागेल. केवळ माझाच धर्म हा जीवनपद्धती या अर्थाने, खरा 'धर्म' असून इतरांचा धर्म हा असा धर्मच नाही, ही भूमिका सोडून द्यावी लागेल. सर्वांनीच आपापले धर्म भारतीय घटनेने दिलेल्या धर्मस्वातंत्र्याच्या अनुरोधाने व मर्यादेत समजून घेतले पाहिजेत, मानले पाहिजेत, मांडले पाहिजेत, आचरिले पाहिजेत. धर्मातील सर्वच्या सर्व आज्ञा आजच्या काळात प्रत्यक्षात पाळता यावयाच्या नाहीत, ही मर्यादा समजून घेतली पाहिजे. इस्लाम हाही धर्माप्रमाणेच सर्व जीवनाचे मार्गदर्शन करणारा धर्म आहे. तसेच मुस्लिमांनीही हिंदूंच्या धर्माचा असाच अभ्यास करून हे समजून घ्यावे की, हिंदूही आपल्या धर्माला सर्व जीवनाचे मार्गदर्शन करणारा धर्मच मानतात. अशा प्रकारे सर्वांनी परस्परांच्या धर्मांचा असाच अभ्यास करून हे जाणून घेतले पाहिजे की, आपल्या धर्माप्रमाणेच इतरही धर्म भारतात आहेत. हे एकदा नीट समजले म्हणजे अशा सर्व धर्मांच्या संपूर्ण आचरणातून निर्माण होणारे प्रश्न, समस्या व गुंतागुंत त्यांच्या लक्षात येईल. त्यांच्या विचाराची पातळी व उंची वाढेल. सर्व धर्मांच्या पलीकडे जाऊन ते राष्ट्राचा, सर्वांचा विचार करू लागतील. इतरांच्या धर्माचा अभ्यास नसण्यातून, त्या धर्माच्या अज्ञानातून स्वतःला आपल्याच धर्माच्या आदर्श कोषात अडकून घेण्यातून भारतात धार्मिक व त्यातून राष्ट्रीय समस्या निर्माण होत असतात, हे लक्षात घेतले पाहिजे. असा अभ्यास केल्यावर मग नेमके प्रश्न वा समस्या कोणत्या आहेत, याचे आकलन होऊन त्या सोडविण्यासाठी उपाय शोधण्याचा विचार करण्याची दृष्टी मिळेल. आणि वर सांगितल्याप्रमाणे हा उपाय भारतीय घटनेच्या मर्यादेतच शोधावा लागणार आहे व घटनेतील सेक्युलॅरिझमची भूमिका समजून घेतली की, हा उपाय सापडू शकतो, असे आम्हास वाटते. [३२] कोणत्याही पक्षाला घटनेतील धर्मनिरपेक्षतेचा अर्थ पाहण्याची इच्छा नाही, कारण त्यांना तो परवडणारा नाही. घटनाकारांनी अतिशय विचारपूर्वक अगदी धर्मनिरपेक्षता (सेक्युलर) हा शब्द घटनेत समाविष्ट करून ठेवला आहे. हा शब्द मूलभूत हक्कांच्या भागातील 'धर्मस्वातंत्र्याचा अधिकार' या शीर्षकाखाली २५ व्या कलमात आहे. भारत सरकारने प्रसिद्ध केलेल्या २८ फेब्रुवारी १९४८च्या राजपत्रातील घटनेच्या मूळ मसुद्यातही हा शब्द आहे. त्या वेळेस हा शब्द असलेल्या कलमाचा क्रमांक १९ होता. सध्याच्या घटनेत तो क्रमांक २५ असा झालेला आहे. तेव्हापासून आजपर्यंत घटनेत आढळ स्थान टिकवून आहे. घटनेत धर्मनिरपेक्ष सेक्युलर शब्द आरंभापासूनच होता. पण आश्चर्याची गोष्ट अशी की, भल्या भल्या अभ्यासकांनी व विचारवंतानी असे सांगितले आहे की, घटनेत आरंभाला 'धर्मनिरपेक्ष' (सेक्युलर) हा शब्द नव्हता. तो १९७६ मध्ये ४२ व्या घटना दुरुस्तीने पहिल्यांदा समाविष्ट करण्यात आला. असे सांगणाऱ्यांमध्ये श्री. मा. प. मंगुडकर, मा. गो. वैद्य, डॉ. स. रा. गाडगीळ, नी. र. वऱ्हाडपांडे प्रभृती असे अनेक विचारवंत तर आहेतच; पण त्यात काही नामवंत कायदेपंडित एम. सी. सेटलवाड प्रभृतींची नावे सांगता येतील.[३३] नरहर कुरुंदकर हेदेखील घटनेत आरंभाला 'धर्मनिरपेक्ष' (सेक्युलर) हा शब्द नव्हता, असेच म्हणतात. कारण नुसता 'धर्मनिरपेक्ष' (सेक्युलर) शब्द असता तर राज्याला धर्मात हस्तक्षेप करता आला नसता, असे मत मांडून त्यांनी घटनेतील 'धर्मनिरपेक्ष'तेचा (सेक्युलर) अर्थ अगदी अचूक व स्पष्टपणे मांडला.

धर्मनिरपेक्ष (सेक्युलर) शब्द आरंभापासून घेतला आहे, हे लक्षात न घेण्याचा परिणाम असा झाला की, घटनेतील अर्थ न पाहता प्रत्येकजण स्वतःच्या मनाने स्वतंत्रपणे अर्थ काढू लागला. १९७६ मध्ये उद्देशपत्रिकेत हा शब्द आला खरा; पण त्या ठिकाणी या शब्दाचा अर्थ आलेला नाही. त्यामुळे भारतातील परिस्थिती, विविध धर्म, धर्मांचा समाजमनावरील प्रभाव, भारताचा प्राचीन काळापासूनचा इतिहास, स्वातंत्र्यलढ्याचा इतिहास, भारताची फाळणी, स्वतःची धर्ममते इत्यादींचा विचार करून आपापल्या सोयीनुसार या संकल्पनेचा अर्थ काढला जाऊ लागला. मग सर्वधर्मसमभाव, धर्मतटस्थता, धर्मसहिष्णुता, धर्मनिरपेक्षता, संप्रदायनिरपेक्षता, निधर्मी इहवाद, मानवतावाद इत्यादी अर्थ मांडले गेले आहेत. घटनेतील कलम २५ मध्ये धर्मनिरपेक्षता (सेक्युलर) हा शब्द कोणत्या अर्थाने आला आहे, हे पाहिले गेले असते, तर अर्थाचा हा सावळा गोंधळ निर्माण झाला नसता. हे

आपण २५ वे कलम पाहिले म्हणून लक्षात आले.

**संदर्भ टिपा :-**

१. तपशिलासाठी पाहा : गरूड शांताराम, 'धर्मनिरपेक्षता : नकली व असली', प्रबोधन, समाजवादी प्रबोधिनी, इचलकरंजी, ११ मे १९९१, पृ. २५.

२. कुरुंदकर नरहर, 'शिवरात्र', इंद्रायणी प्रकाशन, पुणे, आ. २००१, पृ. १४४.

३. कुरुंदकर नरहर, तत्रैव, पृ. १५१, १५२.

४. तपशिलासाठी पाहा, Barker Earnest, 'Principles or Social and Political Theory', London : Oxford University Press, 1951.

५. तपशिलासाठी पाहा, Lasswell H. D., 'The Future of Political Science', New York, Apherton, 1963.

६. कुरुंदकर नरहर, ३ नि., पृ. १५४.

७. तळघट्टी शं. रा., 'धर्मनिरपेक्षता शोध व बोध', कुंभार नागोराव (संपा), 'धर्मनिरपेक्षता म्हणजे काय?', प्रबोधन प्रकाशन, लातूर, आ. १९८८, पृ. २०.

८. काशीकर श्री. गो., 'धारणात् धर्म इत्याहुः।', देशपांडे दि. य., (संपा.) आजचा सुधारक मासिक, अंक ३, वर्ष ४, जून १९९३, पृ. ६२.

९. काणे पां. वा., 'धर्मशास्त्राचा इतिहास' (पूर्वार्ध), महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ, मुंबई, पृ. १०७. तसेच गोखले अरविंद सदाशिव, 'हिंदुत्व : विचार, आक्षेप आणि वास्तव', भारतीय विचार साधना, पुणे, आ. २००९, पृ. १७७.

१०. तपशिलासाठी पाहा : कुरुंदकर नरहर, 'वाटा माझ्या-तुझ्या', राष्ट्रसेवादल, पुणे, आ. १ ली, १९७२.

११. भारताचे संविधान, भारत सरकार, आ. २००२, पृ. १०.

१२. तपशिलासाठी पाहा : मोरे शेषराव, 'मुस्लिम मनाचा शोध', संगत प्रकाशन, नांदेड, आ. १ली, २००१, पृ. ६५७, ६५८.

१३. तत्रैव पृ. ६६०, तसेच मोरे शेषराव, 'अप्रिय पण....', अतुल बुक एजन्सी, नांदेड, आ. १ली, २००१, पृ. ३५.

१४. तत्रैव, पृ. ३९.

१५. तत्रैव, पृ. ३९.

१६. तत्रैव, पृ. ४०.

१७. तत्रैव, पृ. ४१, ४२.

१८. तत्रैव, पृ. ४३.

१९. तत्रैव, पृ. ४४.

२०. तत्रैव, पृ. ४५.

२१. तत्रैव, पृ. ४५.

२२. तत्रैव, पृ. ४५.

२३. तत्रैव, पृ. ४५.

२४. तत्रैव, पृ. ४५.

२५. तत्रैव, पृ. ४५.

२६. तत्रैव, पृ. ४५.

२७. तत्रैव, पृ. ४५.

२८. तत्रैव, पृ. ३५.

२९. मोरे शेषराव, 'मुस्लिम मनाचा शोध', उनि. पृ. ६५८, ६५९.

३०. तत्रैव, पृ. ६५९.

**वाचकांचा पत्रव्यवहार**

प्राचार्य डॉ. पी. एस. पवार
६, ऋषिराज पार्क, मधुकमल नगर
अरिहंत नर्सिंग होमजवळ,
गंगापूर रोड, नाशिक -४२२ ०१३.
दि. २/१२/२०१३

प्रति,
मा. संपादक,
'नवभारत' वाई.

स. न. वि. वि

'नवभारत'च्या नोव्हेंबर २०१३ च्या अंकात सुप्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ प्रा. रमेश पानसे यांच्या 'इंग्लिश सेमी, शिक्षण कमी' या शिक्षणक्षेत्रातील प्रखर वास्तवाच्या मर्मावर बोट ठेवणाऱ्या लेखाला प्रसिद्धी दिल्याबद्दल आभार.

प्रा. पानसे यांनी आपल्या लेखात शिक्षणक्षेत्रातील विविध प्रयोग, त्यांचे यशापयश आणि त्यांतील विसंगती यांचे अत्यंत वास्तव, परखड आणि विविधांगी चित्रण केले आहे. इंग्रजी माध्यमाच्या शाळांचा हव्यास धरणारे पालक आणि सतत धरसोड करणारी शासकीय धोरणे राबविणाऱ्यांच्या डोळ्यांत अंजन घातले आहे.

'प्राथमिक शिक्षण हे बालकाच्या मातृभाषेतूनच दिले गेले पाहिजे', हा विचार आतापर्यंत अनेक शिक्षणतज्ज्ञांनी मांडला आहे. मातृभाषाच विद्यार्थ्यांच्या ज्ञानाकलनास सुलभ आणि म्हणून उपयुक्त आहे. 'शक्यतो शिक्षणाचे माध्यम बालकाची मातृभाषा हेच असावे', अशी सूचना कायद्याद्वारे मिळते. कर्नाटकसारखे राज्य प्राथमिक शिक्षण मातृभाषेतूनच देण्याचा घाट घालते; तर आपल्याकडे कधी पाचवीपासून, तर कधी पहिलीपासून इंग्रजी विषय सक्तीचा करण्याचे प्रयोग झाले. त्याची फलश्रुती विद्यार्थी विषयाकलनापासून दुरावून गळतीत झाल्याचे चित्र पुढे आले. त्याला इंग्रजीचे चांगले प्रशिक्षित शिक्षक नसणे, ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांना इंग्रजीचे परकीय भाषा म्हणून ओझे वाटणे, शिक्षणविभागाची अनास्था यांसारखी अनेक कारणे आहेत. म्हणून विद्यार्थ्यांचा भावनिक आणि बौद्धिक विकास साधण्यासाठी 'मातृभाषेतून शिक्षण' हा प्रा. पानसे यांचा आग्रह केवळ मातृभाषेचा अभिमान म्हणूनच नाही तर विद्यार्थ्यांचा तो हक्क आहे, ही त्यांची भूमिका अत्यंत रास्त आहे.

विद्यार्थ्यांच्या मेंदूचा विकास, त्यांची आकलनक्षमता इत्यादी मुद्द्यांचा प्रा. पानसे यांनी शारीरिक-मानसिक अंगांचा शास्त्रीय ऊहापोह करून त्याचा संबंध शिक्षणप्रक्रियेशी जोडून पुन्हा मातृभाषेतील अध्ययनाचे महत्त्व अधोरेखित केले आहे.

सेमी-इंग्रजी, इंग्रजी माध्यमातील शिक्षणाबद्दलची शासनाची भूमिका विद्यार्थ्यांवर अन्याय करणारी आहे, ही प्रा. पानसे यांची भूमिका सर्वमान्य होण्यासारखी आहे. या इंग्रजी माध्यमातील विद्यार्थ्यांना फक्त विज्ञानशाखेत पुढे जायचे आहे, ही शासनाची धारणाही विद्यार्थ्यांवर अन्याय करणारी आहे. शिवाय सेमी-इंग्रजी ही सोय हुशार, निवडक विद्यार्थ्यांसाठी शाळा करणार असल्याने सामान्य विद्यार्थ्यांत दुजाभाव निर्माण करणारी आहे, हेही सत्य आहे.

एकंदरीत मातृभाषेला टाळून अभ्यास करणारे विद्यार्थी "घोकंपट्टीचा आसरा घेऊनच परीक्षा पार करीत जातात. यातून 'शिकणे' होते पण 'समजणे' राहूनच जाते.", हा लेखकाचा निष्कर्ष मान्यच करावा लागतो.

आपला विश्वासू,
डॉ. पंडितराव पवार

अनुक्रमणिका

## लेखकांचा परिचय

- **प्रा. रमेश पानसे**

प्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ. काही वर्षे अर्थशास्त्राचे पदव्युत्तर स्तरावरील प्राध्यापक. ग्राममंगल संस्थेकरवी आदिवासी भागात व अन्य ठिकाणी शिक्षणविषयक प्रयोग. आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक व साहित्य या विषयांवर विपुल लेखन. सुमारे ३० पुस्तके व ५००च्यावर लेख प्रसिद्ध.

*पत्ता :–* ३१५, प्राज्ञपाठशाळामंडळ, गंगापुरी, वाई ४१२ ८०३ भ्रमणध्वनी : ९८८१२०८३६९

- **प्रा. डॉ. प्रतिभा कामत**

तत्त्वज्ञानाच्या प्राध्यापिका म्हणून निवृत्त. तत्त्वज्ञानविषयक मासिकांमधून लेख प्रसिद्ध.

*पत्ता :* Horizon बिल्डिंग, गोखले रोड, दादर (उ.), मुंबई २८. फोन नं. (०२२) २४४५७७१२.

- **डॉ. द. ता. भोसले**

रयत शिक्षण संस्थेमधून उपप्राचार्य, प्राचार्य म्हणून निवृत्त. लोकसाहित्य मंडळ, लोकसंस्कृती मंडळ, विश्वकोश मंडळ, ग्रामीण साहित्य मंडळ इ. मंडळांचे सदस्य म्हणून कार्यरत. विविध विषयांवरील समीक्षा लेख, चरित्रलेखन, शब्दकोशातील लेखन प्रकाशित. जवळपास ४५ ग्रंथ संपादित व प्रकाशित असून त्यांतील कित्येक ग्रंथांना शासनाचे पुरस्कार प्राप्त.

*पत्ता :–* हॉटेल नागालँडमागे, लिंकरोड, IMA हॉलसमोर, पंढरपूर. जि. सोलापूर
भ्रमणध्वनी : ९४२२६४६८५५

- **प्रा. दत्ताहरी रामराव होनराव**

राज्यशास्त्र विभागप्रमुख, श्री हावगीस्वामी महाविद्यालय, उदगीर.

*पत्ता :–*श्री हावगीस्वामी महाविद्यालय, उदगीर. भ्रमणध्वनी : ७५८८०६७९१६.

---



अनुक्रमणिका

## लेखकांस आवाहन

नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारतकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.

४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

- संपादक मंडळ

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६५ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळयांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारत' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारत' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारत'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारत'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारत'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

**– संपादक मंडळ**

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

## प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

| | सुधारित किंमत २० नोव्हेंबर २००६ पासून लागू |
|---|---|
| ■ वैदिक संस्कृतीचा विकास (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु |
| ■ अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु |
| ■ पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन | १२० रु |
| ■ हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल | २५ रु |
| ■ श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ | ६० रु |
| ■ संशोधन साधना । डॉ. वसंत स. जोशी | ६० रु |
| ■ आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | १५० रु |
| ■ वागीश्वरी । डॉ. गो. के. भट | ६० रु |
| ■ प्रस्थानभेद (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. वा. लेले | ५० रु |
| ■ गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | ४० रु |
| ■ इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | १३० रु |
| ■ दासशूद्रांची गुलामगिरी (भाग २) । शरद पाटील | १५० रु |
| ■ शाहीर हैबती । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु |
| ■ गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी | १४० रु |
| ■ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु |
| ■ बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प. ल. वैद्य | ५० रु |
| ■ हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु |
| ■ पाच पुस्तक-परीक्षणे । वा. म. कुलकर्णी | ६० रु |
| ■ भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर | ३० रु |
| ■ कॉलिंगवुडची कलामीमांसा – एक भाष्य । रा. भा. पाटणकर | १०० रु |
| ■ धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि. के. बेडेकर | ३० रु |
| ■ आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार | १०० रु |
| ■ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार | १५० रु |
| ■ इहवाद आणि सर्वधर्मसमभाव । मे. पुं. रेगे | १२० रु |
| ■ प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा | २०० रु |
| ■ चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | १०० रु |
| ■ विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु |
| ■ नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन । द. ना. धनागरे | ४० रु |
| ■ प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु |
| ■ हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा (दुसरी आवृत्ती) : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २२५ रु |
| ■ पाश्चात्य नीतिशास्त्राचा इतिहास (दुसरी आवृत्ती) : प्रा. मे. पुं. रेगे | १६० रु |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही. पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता* : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)

हे मासिक घ. वा. जोशी यांनी के'सागर ग्राफिक्स अँण्ड प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका

हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई